॥ श्रीहरिः ॥ 1074▲

# आध्यात्मिक पत्रावली

( मराठी )




जयदयाल गोयन्दका

।। श्रीहरि: ।। 1074

# आध्यात्मिक पत्रावली

## (मराठी)

त्वमेव माता च पिता त्वमेव
त्वमेव बन्धुश्च सखा त्वमेव।
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव
त्वमेव सर्वं मम देवदेव॥

जयदयाल गोयन्दका

अनुवादक—**नारायण नरहर भिसे**


**सं० २०७४ बारहवाँ पुनर्मुद्रण २,०००**

कुल मुद्रण ३२,०००

❖ **मूल्य—₹ १२**
**( बारह रुपये )**

प्रकाशक एवं मुद्रक—

**गीताप्रेस, गोरखपुर—२७३००५**

**( गोबिन्दभवन-कार्यालय, कोलकाता का संस्थान )**

फोन : ( ०५५१ ) २३३४७२१, २३३१२५० ; फैक्स : ( ०५५१ ) २३३६९९७

web : **gitapress.org** e-mail : **booksales@gitapress.org**

**गीताप्रेस प्रकाशन gitapressbookshop. in से online खरीदें।**

1074 Adhyatmik Patrawali_Section_1_Back

॥ श्रीहरिः ॥

# विषय-सूची

| पत्र क्र. | विषय | पृष्ठ क्र. |
|---|---|---|

श्रीपरमात्मने नमः

# अध्यात्मविषयक पत्रे

## १

**प्रेमपूर्वक हरिस्मरण.**

आपले पत्र वेळेवर मिळाले होते. समयाभावामुळे उत्तरास उशीर झाला. आपल्या प्रश्नांची उत्तरे खालीलप्रमाणे -

(१) 'भगवन्नामकौमुदी' सारख्या प्रमाण-ग्रंथात जो नाम-महिमा वर्णन केला गेला आहे, तो माझ्या मते खोटा नाही. पण तो सामान्य माणसाच्या लक्षात येण्यासारखा नाही. कारण अविश्वासाच्या पडद्यामुळे, त्याचा त्याच्या प्रभावाशी संपर्कच होऊ शकत नाही. नाम-माहात्म्यावर विश्वास न ठेवणे जर कौमुदीकारांच्या मते नामापराध आहे आणि त्या अपराधामुळे त्याची फलप्राप्ती होत नाही, तर त्या तर्कानेदेखील विश्वासाशिवाय घेतलेल्या नावात समस्त पाप-नाशनाचे सामर्थ्य येऊ शकत नाही. हे अगदी खरे आहे की, 'परमेश्वराच्या नावात जेवढी पापनाशक शक्ती आहे, तितकी पापे करायलासुद्धा कोणी पापी समर्थ नाही.' तरीपण या माहात्म्याच्या आधारावर जाणून बुजून केलेल्या पापांचा नाश 'नाम-महाराज' करीत नाहीत. असे जर झाले, तर नाम हे पापनाशक म्हणून सिद्ध होण्याऐवजी पापकारक म्हणून सिद्ध होईल. वरील उक्तीस प्रेम आणि सातत्य या अटी नसल्या तरी विश्वास ही अट नक्कीच आहे.

गीतेच्या नवव्या अध्यायातील ३० व्या श्लोकानुसार असे सिद्ध होत नाही की, दुराचाराचा संपूर्ण त्याग करूनच नाम-जपाचे सार्थक होते - हे अगदी बरोबर आहे; पण तो दुराचार करू इच्छित नाही आणि त्या प्रवृत्तीचा त्याग करू इच्छितो, हे तरी अगदी स्पष्ट आहे, तसेच हेहि स्पष्ट आहे की, त्याचा विश्वास दृढ आणि अटळ आहे. म्हणून त्याचे त्यानंतर

शीघ्र धर्मात्मा होणे, हे त्या परमसुहृद परमेशाच्या अकारण दयेवर अवलंबून आहे. म्हणून तो अर्थ सर्वथा योग्यच वाटतो.

श्री तुलसीदासांचे कथनहि विश्वासालाच प्राधान्य देते आणि विश्वास वाढावा म्हणूनच त्यांनी असे म्हटले आहे. या कथनाचे समर्थन तर भगवंताने गीतेच्या सहाव्या अध्यायातील ४० व्या श्लोकातही केले आहे.

आपण लिहिले आहे की, प्रेम आणि विश्वास या गोष्टी साधनेने प्राप्त होण्यासारख्या नाहीत, अर्थात् त्यांच्या प्राप्तीसाठी क्रियात्मक साधनामार्ग उपलब्ध नाही; परंतु श्रद्धाळू महापुरुषांची संगत, त्यांच्या प्रवचनांचे अध्ययन आणि त्यांची व ईश्वराची विशेष कृपा तसेच साधकाच्या हृदयात प्रेम व विश्वास यांच्या आवश्यकतेची जागृती या सगळ्या गोष्टी प्रेम व विश्वास यांची वृद्धी करणाऱ्या आहेत. म्हणून साधकाने निराश व्हायचे कारण नाही. श्रद्धा आणि विश्वास यांनी प्रेम वृद्धिंगत होते आणि प्रेमाने श्रद्धा-विश्वास वाढतात, असा यांचा परस्पर संबंध आहे.

भजनातही निरंतरता ही प्रेम आणि त्याविषयी वाटणाऱ्या निकडीतूनच निर्माण होऊ शकते. साधकाच्या मनात त्याबद्दल जेवढी आपुलकी असेल, आपल्या साधनारूप जीवनासाठी त्याला जितकी उत्कट गरज भासेल तितके प्रेम व विश्वास वाढतील व भजनात निरंतरता येईल. आपण लिहिले आहे की, निरंतरतेचे पूर्णत्व निर्विकल्प समाधीत आहे. पण तसे काही नाही. ही गोष्ट प्रेमसमाधी व योगसमाधीपेक्षा भिन्न आहे. गोपी काय आपापल्या घरची कामे करीत नव्हत्या ? पण कधी क्षणभरासाठी तरी त्यांना भगवान श्रीकृष्णाचा विसर पडायचा का ? त्यांचे कृष्णाच्या ठायी अनन्य प्रेम होते. जे काही त्या करायच्या ते स्वतःसाठी नाही, तर भगवान कृष्णासाठी, त्याचेच काम समजून करायच्या. म्हणून ते काम कृष्णाच्या स्मृतीचा विसर पाडणारे नसून स्मृती वृद्धिंगत करणारेच असायचे. ही निरंतरता अभ्यासापेक्षा प्रेमावर अधिक निर्भर आहे. अभ्यासाद्वारे प्राप्त केलेली निरंतरता इतकी चिरस्थायी नसते. आपण विचारले आहे की, 'जीवाचे शीघ्र कल्याण कसे होईल ?' याचे उत्तर असे की, कल्याणाशिवाय जीवन जगणे अशक्यप्राय आहे, अशी उत्कट इच्छा जागृत झाली तरच शीघ्र कल्याण शक्य आहे.

जोपर्यंत साधकाला त्याची आवश्यकता सर्वसाधारण वस्तूएवढीच वाटते आहे, तोपर्यंत त्याचे कल्याण कसे बरे होईल ?

(२) सुख-दुःख हे वस्तूंच्या संयोग-वियोगाशी निगडित नाही, परंतु माणसाच्या भावनांच्या अनुसार बदलणारे आहे. वस्तूंचे संयोग-वियोग आणि विभिन्न घटना या प्रारब्धाशी जोडलेल्या आहेत, पण त्यात सुखदुःखाचा अनुभव करणे हे मनुष्याच्या भावनेवर अवलंबून आहे. त्यात तो स्वतंत्र आहे. नेहमीच्या जगात आपण पाहातो की, लोभी माणसाला जेव्हा एखाद्या कामात धनप्राप्तीची खात्री पटते, तेव्हा त्यासाठी केले जाणारे परिश्रम त्याला त्रासदायक किंवा कठीण वाटत नाहीत; इतकेच नव्हे तर त्यासाठी मानसन्मान आणि धर्माचाहि त्याग करून तो आनंदाने अपमान, निंदा आणि पापदेखील स्वीकारतो. म्हणून एखाद्या घटनेला दुःखदायक न मानण्यास साधक आपल्या भावनेने पूर्णपणे स्वतंत्र आहे. परंतु घटना बदलण्याचे स्वातंत्र्य त्याला नाही. एखाद्या घटनेच्या परिवर्तनासाठी 'नामा'सारखे अमूल्य धन वाया घालवता कामा नये.

(३) कोणतीहि दुःखद घटना, परमेश्वरी विधान समजून, निर्विरोध, सहर्ष सहन करणे सर्वथा योग्य आहे. इतकेच नव्हे, तर भक्त ईश्वराच्या विधानाचा विरोध न करता, स्वतःचे दौर्बल्य स्वीकारून परमेश्वराची विश्वासपूर्वक याचना करतो, तो परमेश्वरावर निर्भर असतो, म्हणूनच त्याच्यात हे मनाचे औदार्य येते. पीडितावस्थेतील भक्ताच्या बाबतीत असे अधिक वेळा घडते.

(४) व्याकुळ आणि दीन भक्ताची याचना, परमेश्वर विश्वास आणि आवश्यकता यांना प्राधान्य देऊन ऐकतो. त्यावेळी त्याची इच्छा पण तशी होते आणि भक्ताचे प्रारब्धहि तसेच बनते.

(५) मनुष्य खाणे-पिणे, झोप-आराम इत्यादी सोडून निरंतर तोंडाने जप करण्यास असमर्थ आहे; कारण शब्दोच्चारणात वाणी आणि प्राण दोहोंचे बळ आवश्यक आहे. पाण्याशिवाय प्राणातले त्राण लवकरच घटू लागते, म्हणून त्याच्या त्यागाचा प्रश्नच उद्‌भवत नाही. अर्थात्, प्रेममुग्ध साधक भजनाच्या नादात जेवणखाण आणि शरीराची शुद्धबुद्ध विसरला

तर गोष्ट वेगळी. त्या स्थितीची गणना 'त्यागणे' या वर्गात होत नाही. म्हणून सर्व काही परमेश्वरासाठीच करीत करीत निरंतर भजन करणे ही सर्वोत्तम साधना आहे, हे सिद्ध होते. शास्त्रोक्त विधीचे समर्थनहि याच पद्धतीचे आहे आीण परमेश्वराला संतुष्ट करायचा उपायदेखील हाच आहे. परमेश्वर क्रियेपेक्षा भावाला अधिक किंमत देतो. म्हणून साधकाने आपला भक्तिभाव वाढवण्यावर अधिक ध्यान द्यावे. थोडीशी क्रियासुद्धा जर भावपूर्ण असेल तर अधिक फलदायक आहे आणि वर्षानुवर्षांची भावहीन मेहनतसुद्धा त्यापुढे फिकी पडते.

## २

**सप्रेम हरिस्मरण.**

आपल्या पत्रांची उत्तरे खालीलप्रमाणे-

चालताना, उठताना, बसताना सारखे देवाचे नाव घेणे निश्चितच उत्तम आहे. भजनात पूजापाठाची पण मदतच होते. मग पूजापाठावर आक्षेप असण्याचे कारण काय ? नाम-जप आणि पूजा दोन्हीही बरोबर चालू ठेवली, तर काम लवकर होईल.

ध्यान करताना शरीर स्थिर राहिले तर छानच, परंतु प्रेम आणि श्रद्धेला अधिक महत्त्व आहे. जसे जमेल तसे ध्यान अवश्य करीत राहिले पाहिजे.

नुसत्या नाम-जपानेच कल्याण होते यात काही संशय नाही, परंतु त्याबरोबर देवाच्या रूपाचे ध्यान पण होत राहिले, तर लवकर कल्याण होईल.

हिंडता-फिरताना, उठता-बसताना, पत्र लिहिताना सुद्धा आपणास देवाच्या रूपाचे ध्यान राहते, असे आपण लिहिले आहे. उत्तम गोष्ट आहे. परंतु हे स्मरणमात्र आहे. ध्यान ही याहीपुढची स्थिती आहे. सामान्य व्यवहारात आपण स्मरणालाच ध्यान म्हणतो.

मलदोषामुळे उत्साहहीनता संभवते. बऱ्याच वेळा विश्वासाच्या अभावानेही उत्साहहीनता उद्‌भवते.

ईश-तत्त्व आणि ईश्वरी रहस्य जाणून घेताना प्रेमवृद्धी होते आणि

परमेशाच्या गुण-प्रभावाची ओळख पटल्यावर ते तत्त्व आणि रहस्य समजून घ्यावयास मदत होते. पराभक्तीच्या प्राप्तीनंतर भगवद्दर्शन होते हे खरे, परंतु अचानक प्रेमाचा उद्रेक झाला, तर त्यापूर्वीसुद्धा ईश्वरी साक्षात्कार होतो. आपण ज्याला अनन्य प्रेम म्हणता, ते पराभक्तीचेच सूचक आहे; परंतु ज्ञानयोग्याच्या दृष्टीने, ज्ञानाची पराकाष्ठा म्हणजेच पराभक्ती होय. समाधी लावणे जरूर आहे, अशातला भाग नाही. नाम-जप, प्रेम, श्रद्धा आणि निष्काम कर्म आदी अनेक प्रकारच्या मार्गांनी ईश्वरप्राप्ती होऊ शकते.

आपल्यावर जे संकट आले आहे ते केव्हा टळेल, हा तर प्रारब्धाचा भाग झाला. भजनाशी त्याचा संबंध जोडणे चुकीचे आहे. आपली मनीषा केव्हा पुरी होईल हे देवालाच माहीत. पुरी होईल किंवा नाही, हेही तोच जाणतो. आपल्या इच्छा मनातून समूळ नाहीशा करणे, हे सगळ्यात चांगले.

आपण लिहिले आहे की, 'पूर्वी चांगले अनुभव यायचे, गेली दोन वर्षे उत्साह ढिला पडत चालला आहे.' यासाठी देवाची प्रार्थना केली पाहिजे. देव आपली उपेक्षा करतो, असे मानणेच मुळी चुकीचे आहे. खरे तर देवासारखा परममित्र दुसरा कोणी नाही.

भक्त ध्रुवाप्रमाणे गृहत्याग करून वनात जाऊन साधना करायची इच्छा आपण प्रकट केली आहे. पण वस्तुस्थिती अशी आहे की, देवाची प्राप्ती तर श्रद्धा आणि प्रेमाने होते. मग घर आणि वन यात काही फरक नाही. दुःखाच्या भरात घर सोडून वनात गेल्यावर जेव्हा आणखी हालअपेष्टा सहन करायची पाळी येते, तेव्हा वैराग्य डळमळू लागते. अशा अवस्थेत खूप विचार करून निर्णय घेतला पाहिजे. माझ्या मते, निरासक्त होऊन घरात राहूनच भजन-ध्यानावर जोर द्यायचा प्रयत्न करावा.

संत तुकारामांनी गृहस्थ-धर्मत्यागाबद्दल जे लिहिले आहे, ते या समयी उपयुक्त नाही. माझे तर असे मत आहे की, घर-दार, धन-धान्य, बायको-मुले यांच्यात राहूनच अनासक्ती निर्माण केली तरी खूप आहे.

आपण मानस-जप करता, हे छानच आहे. अवश्य करावा. आत्मकल्याणासाठी मानस-जपच श्रेष्ठ आहे. नाभीपासून जप करणे जरूरी नाही.

आपण नामसंख्येचा हिशेब ठेवत नाही, तेही ठीक आहे. मनाला टाळाटाळ करायला वाव मिळू नये, म्हणून हिशेब ठेवला जातो. त्या दृष्टीने मोजून जप करणेहि चांगले.

कल्याणच्या साधनांकात नऊ कोटी जपाने साक्षात्कार होतो, असे लिहिले असल्याचे आपण म्हणता; मला तरी याचे शास्त्रीय प्रमाण असल्याचे माहीत नाही.

आपण संबंधित लेखकास विचारावे.

कलिसंतरणोपनिषदात छप्पन कोटी नाम-जपाने साक्षात्काराबद्दल लिहिले आहे, अर्थात् मंत्रसंख्या साडेतीन कोटी होईल.

गहन साधनेनेच तीव्र मनोवेग तयार होतो. जो साधनामार्ग आपण स्वेच्छेने ईशप्राप्तीप्रीत्यर्थ स्वीकारला आहे, त्यानुसार सघन अभ्यास करणे आपले परम कर्तव्य आहे. त्यानेच ईश्वराचे दर्शन सुलभ होईल. गहन साधना, सघन अभ्यास किंवा तीव्र मनोवेग - काहीही नाव द्या, भावार्थ एकच.

## ३

**सादर हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. ऋषिकेशच्या सत्संगाला येण्याची आपली इच्छा होती, पण जमले नाही - त्याबद्दल वाईट वाटून घ्यायचे कारण नाही.

आपण मनाच्या विचित्र दशेबद्दल आणि त्याला मार्गावर आणण्यासाठी कुठल्यातरी महान शक्तीच्या प्रेरणेची आवश्यकता असल्याचे लिहिले आहे. अशी शक्तिमान प्रेरणा तर पूर्णब्रह्म परमात्माच देऊ शकेल. त्याला शरण गेल्यास मन शांत होईल आणि आत्म्याचे पण कल्याण होईल.

मनात चिकित्सा आणि संकल्प तर निर्माण होतच असतात. जगात आपले अस्तित्व आहे किंवा नाही ? आपले कर्तव्य काय ? हीही एक

प्रकारची चिकित्साच आहे. जगात आपले अस्तित्व तर आहेच, त्याला प्रमाण कशाला हवे ? जी गोष्ट प्रत्यक्षात आहे, त्याला प्रमाणाची आवश्यकता नाही. "आपले कर्तव्य काय" - याबद्दल आपण विचारणा केली आहे. मुखाने देवाच्या नामाचा जप, मनाने त्याच्या स्वरूपाचे ध्यान आणि शरीराने जनसेवा - हेच मनुष्याचे परमकर्तव्य आहे. मार्गदर्शनासाठी स्वत: परमेश्वर किंवा त्याचे भक्त आहेतच. योग्य ते मार्गदर्शन करून आपल्या शरणागताचा ते भवसागरातून उद्धार करतात.

जोपर्यंत मन, वचन आणि कर्म ईश्वराप्रत लागत नाही, तोपर्यंत आपण पतनाच्या मार्गालाच लागणार. जेव्हा हे तीनही त्याच्या सेवेत अर्पण होतात, तेव्हाच आपण योग्य मार्गी लागतो.

ईश्वराची आराधना सुरू केल्यावर त्यात तीव्रता आपोआप येते. थोड्याशा प्रेमाने जरी आराधना सुरू केली तरी बाकी तीव्रता ईश्वर स्वत: निर्माण करतो. मन त्याच्या चरणी लावले की पुरे. ते जोपर्यंत या संसारात भटकत राहील, तोपर्यंत देवाच्या ठायी लागणे कठीण आहे. शक्ती प्रदान करायचे सामर्थ्य माझ्यात नाही. त्यासाठी आपण त्या सर्वशक्तिमान प्रभूचीच विनवणी करा. तुमची ती प्रेमसंपृक्त हाक तोच ऐकेल. अंधारात प्रकाशाचा किरण तोच दाखवेल. गंज लागलेले यंत्र चालवायची शक्ती पण त्याच्यातच आहे. आपण त्याच्यावर भरवसा ठेवा आणि हळूहळू त्याच्या ठायी चित्त लावा. निरंतर त्याच्या नावाचा जप करायचा प्रयत्न करा.

श्रद्धा आणि भक्तिपूरित अंत:करणाने केलेले प्रभूचे नामस्मरण आणि पाठ मृत जीवाच्या आत्म्यास शांती प्रदान करतात. आत्मा अमर आहे, तो शुद्ध ब्रह्म आहे, हे खरे; पण या स्थूल शरीरद्वारा मायावश केले गेलेले दुर्गुण-दुराचाररूपी विकार जीवात्म्याच्या बरोबर जातात आणि त्यांची फळे जीवात्म्यास भोगायला लागतात.

मी ऋषिकेशहून इथे (बंगालमधल्या बांकुडा शहरी) आलो आहे. इथे आणखी काही दिवस राहण्याचा मानस आहे. दरवर्षी चैत्राच्या महिन्यात ऋषिकेशला जाणे होते. तिथे साधारणत: तीन महिने वास्तव्य

असते. आपणही तेव्हा तिथे येऊ शकता. सत्संगाच्या निमित्ताने खूप लोक येतात तिथे. बाकी भगवत्कृपा.

## ४

**सादर प्रणाम.**

आपले पत्र वेळेवर मिळाले होते, परंतु समयाभावामुळे उत्तरास उशीर झाला. आपल्या शंकांचे क्रमवार समाधान खाली देत आहे -

(१) ईश्वर अनेक-प्रकृती आहे. एक प्रकृती तर ती, जिच्यामुळे सारे प्राणिमात्र मोहित आहेत. दुसरी आहे दैवी प्रकृती, जिच्या आश्रयास जाऊन मानवाचा उद्धार होतो. जिच्या योगाने परमेश्वर अवतार-रूप धारण करतो, ती तिसरी प्रकृती. एक प्रकृती अशीही आहे, जिच्यामुळे तो समस्त विश्वाची उत्पत्ती, स्थिती आणि पालन करतो. अशाप्रकारे ईश्वरी प्रकृतीचे अनेकविध प्रकार आहेत.

ईश्वराचे रूप सगुण, निर्गुण, साकार, निराकार सर्वप्रकारचे आहे. जशी ज्या भक्ताची श्रद्धा तसे त्याचे रूप. तेच त्याच्यासाठी योग्य. ईश्वराचा प्रादुर्भाव आणि लय अनेकानेक कारणांनी अनेक प्रकारे आणि अनेक रूपांत होतो.

परमेश्वराने हे विश्वरूप नाटक प्राणिमात्रांच्या कर्मफलभोगासाठी रचले आहे, हाच निश्चित उद्देश असल्याचे शास्त्र सांगते.

देवाचे हे रचनाकार्य अनादि कालापासून चालत आले आहे. या संदर्भात, केव्हापासून आणि कधीपर्यंत हे प्रश्न उद्भवतच नाहीत. गीतेत यालाच अनादि-अनंत म्हटले आहे. (गीता १५.३)

(२) कुणाही व्यक्तीद्वारा जाणूनबुजून केलेले दुष्कर्म किंवा कुणाची हत्या यात प्रारब्धाचा काही संबंध नाही. तो कर्त्याचा अपराध आहे आणि त्याला त्याची शिक्षा निश्चितच भोगायला लागेल. ज्याप्रकारे धर्मयुद्धात योद्धे निमित्त असतात, त्याप्रमाणे परमेश्वरी विधानामुळे कुणाच्या हातून कुणाचा मृत्यू निश्चित असेल तर त्यात परमेश्वर न्याययुक्त निमित्ताची

योजना करतो. तथापि स्वार्थापोटी किंवा अन्यायवश एखाद्याला दु:ख देणे, कुणाची हत्या करणे किंवा कोणतेही दुष्कर्म करणे - हे प्रारब्ध अथवा ईश्वरी विधान नाही.

ज्याला त्याला प्रारब्धानुसारच सुख किंवा दु:ख भोगायला लागते. पण ते सुखदु:खभोग अमक्याद्वारेच मिळतील, असे निश्चित नाही.

मनुष्याला कर्माचे स्वातंत्र्य आहे, परंतु कर्मफलभोगाच्या बाबतीत तो परतंत्र आहे. शेतात पेरणी करणे मनुष्याचे काम, पण पाऊस पडणे न पडणे, पीक होणे न होणे, हे त्याच्या हातात नाही. ते भाग्यावर अवलंबून आहे. कर्मफल, प्रारब्ध आणि भाग्य हे सारे भाषेचे पर्यायमात्र आहेत.

मनुष्य आसक्ती व स्वार्थवश दुष्कर्म करतो, म्हणून ते पाप आहे. त्याचे दु:खरूपी फळ कर्त्याला निश्चितच भोगायला लागते. सत्कर्माचे फळ चांगलेच मिळेल. लोक दोन्ही प्रकारची कर्मे करतात, म्हणून फळ देखील चांगले व वाईट, दोन्ही प्रकारचे भोगतात.

(३) मनुष्याचा आणि अन्य प्राणिमात्रांचा मृत्युसमय ठरलेला असतो; परंतु त्यात एका क्षणाचीही अदलाबदल होत नाही, असे नाही. खूप कारणांनी असा बदल संभवतो.

मृत्यूची वेळ विधि-लिखित आहे, असे म्हणण्याची प्रथा आहे, परंतु त्याचा अर्थ एवढाच की, प्राणिमात्रांच्या कर्मानुसार त्यांचा जन्म-मृत्यू आणि भोग निश्चित केले जातात.

मनुष्य आत्महत्येद्वारा आपले आयुष्य कमी करू शकतो किंवा योगसाधनेद्वारा वाढवू शकतो. आयुष्य कमी-जास्ती करण्यास अशीच आणखीही कारणे असू शकतील.

भूकंप, विद्युत्पात, अग्निकांड, पूर आणि विभिन्न दुर्घटना दैवी कारणांनी होतात. या गोष्टी विधिलिखित समजाव्यात. या घटनांमध्ये ज्याचे मरण निश्चित असते तोच मरतो, दुसरा नाही.

याउलट, वेदात आणि शास्त्रात आयुष्यवृद्धीची जी साधने वर्णन केलेली आहेत, ती उचित आणि न्याययुक्त आहेत. त्यानुसार साधना

करणाऱ्याचे आयुष्य अवश्य वाढते. जी माणसे आपल्या आरोग्याची चिंता करीत नाहीत आणि कुपथ्य करतात, ती निश्चितच चूक करतात.

(४) मृत्यूनंतर जीवात्मा आपल्या कर्मानुसार इहलोकीच दुसऱ्या योनीत जन्म घेतो किंवा स्वर्गनरकादी लोकांत प्रयाण करतो. जीवांच्या मृत्यूनंतरच्या गतीचे अनेक प्रकार शास्त्रांत सांगितले आहेत. ते सगळे त्यांच्या त्यांच्या कर्मानुसार असतात. वर्तमान स्थूल शरीर आणि जीवात्मा यांच्या संबंध-विच्छेदाचे नावच 'मृत्यू' आहे.

स्वर्ग आणि नरक ही निश्चित स्थाने आहेतच. शिवाय नीच योनी पण नरकवतच मानल्या जातात. यम आणि त्याचे दूत यांचे अस्तित्वही नक्कीच आहे. शास्त्रात जे जे लिहिले आहे, ते ते सत्य मानावे. अशा खूप गोष्टी आहेत, ज्या दिसत नाहीत आणि आपल्या तर्काला देखील पटत नाहीत; पण त्या गोष्टींच्या तात्विक जाणकारांच्या कथनावर विश्वास ठेवणे आपल्याला भाग पडते.

(५) नरकवासात सगळ्या पापांची फळे भोगली जात नाहीत. ठराविक पापांची फळेच नरकयातनांमध्ये भोगावी लागतात. बाकी कर्मांची फळे भोगण्यासाठी मनुष्यास पुन: नाना योनींमध्ये जन्म घ्यावा लागतो. त्यातच कधीतरी मनुष्यजन्म पण वाट्याला येतो. मनुष्ययोनीत जर तो जीव शास्त्रसंमत मार्गावर प्रयत्नरत राहिला, तर तो सर्व पापांपासून मुक्त होतो आणि साधनेचा अवलंब करून ईश्वरी साक्षात्कारही करू शकतो (गीता १६.२२).

(६) ईश्वराचा साक्षात्कार केवळ भक्तीनेच होतो. मग ती भक्ती देवाच्या गुण-प्रभावाच्या श्रवणाने होवो, मनन करून होवो किंवा चिंतनाने होवो. परंतु ईश्वरी साक्षात्काराचा खरा रामबाण उपाय आहे त्याच्या ठायी अनन्य श्रद्धा आणि प्रेम (गीता ११.५४). ईश्वराची अनंत रूपे आहेत, म्हणून त्याचे अमुक रूप असेच आहे, असा समज करून घेता कामा नये. भक्त त्याला ज्या रूपात बघायची इच्छा करतो, त्याच रूपात देव त्याला भेटतो.

(७) मनुष्य मरणोपरांत दूर, समुद्रापलीकडच्या देशात देखील जन्म घेऊ शकतो. त्या देशात जितके प्राणी आहेत, त्यांनी कधी न कधी इथे सुद्धा जन्म घेतला असेल; कारण सृष्टीचे हे रहाटगाडगे अनादिकालापासून चालत आले आहे. मागे म्हटलेच आहे की, जीवाच्या कर्मानुसार विभिन्न योनींमध्ये जन्म प्राप्त होतो. मनुष्य योनीखेरीज दुसऱ्या योनींत नवीन कर्म होत नाही. त्या योनीमध्ये जर एका जिवाकडून दुसऱ्या जिवाची हत्या झाली, तर ती प्रारब्धानुसारच होते. त्याचा पापपुण्यरूप हिशेब होत नाही, पण मानवी शरीराचे असे नाही. कारण त्याला कर्तव्य-अकर्तव्य जाणण्याची शक्ती मिळालेली आहे.

(८) परमपिता परमात्माच वेळोवेळी विष्णू, शिव, राम, कृष्ण इत्यादींच्या रूपात प्रकट होतो. म्हणून ती सगळी नावे त्याचीच आहेत, असे मानणे सयुक्तिक आहे.

गणेश, कुबेर आदी देवतांचा समुदाय निश्चितच आहे. त्यांची स्थाने पण निश्चित आहेत. त्यांचे नोकरचाकर, सेवेकरी पण असतील असे मानावे. कर्मानुसार देवांनादेखील सुखदु:खे निश्चितच भोगायला लागतात. त्यांच्यातही कुणी लहान, कुणी मोठा असे असणारच.

मनुष्याची बुद्धी अल्प आणि मर्यादित आहे. नजरेसमोरच्या वस्तूचे देखील त्याच्या बुद्धीला नीट आकलन होत नाही. मग त्याला अदृष्ट विषयांबद्दल निर्णय करणे तर अशक्यच. म्हणून शास्त्रात जे सांगितले आहे त्यावर त्याने विश्वास ठेवावा; कारण शास्त्रकारांनी जे लिहिले आहे, ते सामान्य माणसांच्या हितासाठीच लिहिले आहे.

## ५

**सविनय प्रणाम.**

आपले सविस्तर पत्र मिळाले. आपण आपली व आपल्या कुटुंबाची संकटग्रस्त स्थिती सविस्तर कळविली ती वाचली. ही इतकी संकटमय स्थिती मुख्यत्वे पूर्व-संस्कारांमुळे आली आहे, असे समजून ती सहन करा.

अनिच्छेने किंवा पर इच्छेने जे जे दुःख आपल्या वाट्याला येते, ते ईश्वरी विधान समजून, त्यात पदोपदी त्याच्या दयाळूपणाचे दर्शन घ्यावे. मनुष्याला कष्टात टाकून, त्यायोगे त्याच्या पूर्वकृत पापांचे क्षालन करून, परमेश्वर त्याचे शुद्धीकरण करतो आणि त्याला सचेत करतो. त्यामुळे मनुष्य भविष्यात पापांपासून दूर राहातो आणि संकटकाळी देवाला आळवतो. त्यायोगे मनुष्याचा मोठा लाभ होतो.

केवळ देवच सकलजनांच्या मदतीस व दुःखनिवारणार्थ समर्थ आहे. दुःखातून मुक्त होण्यासाठी परमेश्वराची आळवणी केली पाहिजे. त्याच्या दयेने सर्व दुःखे दूर होऊ शकतील.

आपण लिहिले आहे की, आपल्या घरच्या देवघरातील शिवपंचायतनाच्या मूर्तींमधली शेषनागाची प्रतिमा भंग पावली आहे. त्याची पूजा करावी किंवा नाही ? नाही. खंडित मूर्तीची पूजा करायची नसते. ती गंगार्पण करून नवी मूर्ती आणून तिची विधिवत स्थापना करून मग पूजा करावी.

आपण विचारता की, "मी विष्णुसहस्रनाम, शिवसहस्रनाम, सप्तश्लोकी दुर्गा, गीतेचा एक अध्याय, शिव-गणेश-विष्णु-देवी-नवग्रह यांची स्तोत्रे आणि रुद्रीच्या २/१० अध्यायांचा पाठ करतो. नवार्ण, षडक्षर, शिवमंत्र, द्वादशाक्षरी श्रीमंत्र या मंत्रांची एक एक माळ जपतो. तसेच संध्यावंदनही करतो. यात काही फेरबदल करावा का ?" माझ्या मते, यातल्या एकाला इष्ट देव मानून आणि इतरांना त्याचे भक्त समजून किंवा आपल्या इष्टदेव स्वामीशी आज्ञाधारक राहून इतर देवतांची पूजा निष्काम भावाने करावी. समजा, श्रीविष्णूस इष्टदेव मानत असाल तर त्याचेच ध्यान, '**ॐ नमो भगवते वासुदेवाय**' या मंत्राचा जप आणि विष्णुसहस्रनामाचा पाठ करावा. समजा, शंकराला आराध्य दैवत मानत असाल तर शिवाचेच ध्यान, '**ॐ नमः शिवाय**' या मंत्राचा जप आणि शिवसहस्रनामाचा पाठ करावा. असेच बाकी देवतांविषयी समजावे. आपण ज्याला इष्टदेव किंवा आराध्य दैवत मानतो, त्याला साक्षात् परब्रह्म परमात्मा मानावे आणि

बाकी देवतांना त्याची प्रभावळ किंवा भक्त मानून निष्काम भावाने उपासना करावी.

आपण लिहिले आहे की, ''बंधूंना सन्मार्गाची आवड निर्माण व्हावी, यासाठी वेगळे पत्र लिहा; कारण आमच्या सांगण्याचा ते उलटाच अर्थ काढतात. आपले म्हणणे बरोबर आहे. त्यांना माझ्या वतीने सांगा की, निष्काम भावाने, शास्त्रसंमत धर्मपालन करण्याने मुक्ती मिळते आणि विपरीत आचरण नरकाप्रत घेऊन जाते. त्यांना माझ्या वतीने समजावण्याचा प्रयत्न करा. जर त्यांना पटले तर छानच.

आपण लिहिले आहे की, ''कंटाळा आला जीवनाचा, मनाला शांती नाही, अगदी दु:खी आहे; परमेश्वराला मृत्युदान मागतो आहे पण तेही मिळत नाही.'' मृत्यूची इच्छा करून मृत्यू येत नसतो आणि त्याने काही फायदा पण नाही. म्हणून मरणाची इच्छा करण्यात अर्थ नाही. परमेश्वराला शरण जाऊन त्याची करुणा भाकली पाहिजे. त्यानेच शांती मिळू शकेल.

आपण लिहिता की, ''जर आपण मला आपल्या आश्रमात स्थान दिले तर तिथेच भजन-पूजनात समय व्यतीत करीन.'' ते सारे ठीक आहे. पण आमच्याकडे तशी काही सोय नाही. जे लोक स्वर्गाश्रमात राहण्यासाठी येतात, ते आपल्या स्वत:च्या खर्चाने राहतात. तिथे काही महिने राहायची सोय तर होते, पण जेवण्याखाण्याचा खर्च आपण स्वत:च करावा लागतो.

सर्वांना आनंद होईल अशा गोष्टी कराव्यात. भजन-ध्यान निरंतर करीत जावे.

## ६

**सादर नमस्कार.**

आपले पत्र मिळाले. एक महिना होऊन गेला. समयाभाव आणि अन्य अनेक कारणांमुळे वेळेवर उत्तर लिहू शकलो नाही. क्षमस्व. आपण आपला परिचय आणि घरची सारी परिस्थिती वगैरेबद्दल कळविले, ते समजले. आपण गेली तीन वर्षे 'कल्याण' वाचता. चांगले वाटले.

त्यातून आपली आस्था प्रकट होते. 'कल्याण' वाचल्यावर आपणास असे वाटले की, गेला २३ वर्षांचा काळ वाया गेला आणि आता सत्संगी लागून बाकी जीवन कारणी लावले पाहिजे, अशीही इच्छा आपण पश्चात्तापाने जाहीर केली आहे. वाचून फार चांगले वाटले. ज्यायोगे बाकी जीवन व्यर्थ जाण्यापासून वाचू शकेल, तोच खरा पश्चात्ताप. आपण लिहिले आहे की, "सत्संगासाठी घर सोडायला लागले तरी मी ते आनंदाने सोडीन." घर सोडून माझ्याजवळ राहण्याची आपली इच्छा ही माझ्यावरच्या आपल्या प्रेमाचे द्योतक आहे. परंतु त्याने आपल्या घरच्या लोकांना वाईट वाटेल. तरीदेखील आपला आग्रहच असला तर, मी साधारणपणे फाल्गुन-आषाढच्या दरम्यान सत्संगासाठी ऋषिकेशला गीताभवनात (हरिद्वारजवळ) राहतो, तेव्हा आपणही तेथे येऊ शकता. तिथे आपणास सत्संग, साधना आणि सेवा या तिन्हींचा लाभ होईल.

आपण रामायणातले एक उदाहरण दिले आहे- '**पुरुष त्यागि सक नारिहि जो बिरक्त मतिधीर**' अगदी बरोबर आहे. याचा भावार्थ असा की, जो खरा विवेकवैराग्यसंपन्न धैर्यवान पुरुष असतो, तोच स्त्रीपासून दूर राहू शकतो. तो जाणूनबुजून स्त्रीत्याग करीत नाही. खरे तर तो घरात राहूच शकत नाही. अशा पुरुषाबद्दल हे वचन आहे.

आपण लिहिता की, "सत्संग शक्य नसेल तर स्वाध्याय करावा असे कुणीही म्हणेल, परंतु मला घरी वेळच मिळत नाही." ठीक आहे, वेळ कमी असला तरी हरकत नाही. खरे तर थोडावेळ जरी स्वाध्यायात खर्च केला तरी कल्याण होईल. परंतु जर वेळेचा नीट उपयोग नाही केला गेला तर किती वेळ जरी स्वाध्याय केला तरी त्याचा फायदा नाही.

आपण '**वरं वनं व्याघ्रगजेन्द्रसेवितम्...**' या श्लोकाच्या उदाहरणाने वैराग्यभाव दाखवून सत्संगरहित जीवनाची निंदा केली आहे. ठीक आहे. ही वृत्ती असणारा विरागी पुरुष खरोखर अभिनंदनास पात्र आहे.

आपण माझ्या संदर्भात समर्पणाची गोष्ट केलीत. आपण असे लिहिणे योग्य नाही. केवळ परमेश्वरच समर्पणास योग्य आहे. स्वत:ला त्याच्या चरणीच सर्वस्वभावाने समर्पित करावे.

प्रेमपूर्वक, निष्कामभावाने, निरंतर भजनध्यान करीत राहायचा प्रयत्न करावा.

७

**सप्रेम हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. आपण लिहिले आहे की, 'माझ्या ज्या काही चुका झाल्या असतील, त्याबद्दल क्षमा करा.' असे आपण लिहायला नको होते. आपण जर काही चूकच केली नाही तर क्षमेचा प्रश्नच कुठे उद्भवतो ?

आपल्या प्रश्नांची उत्तरे खालीलप्रमाणे -

१) आत्म्याच्या साक्षात्कारानंतर पतनाची भीती उरत नाही. एकदा आत्म्याचे दर्शन झाले की, या जन्मातच साधना आणि अनुभव या दोन्हीचा अंत होतो. तरीही नंतर लोकसंग्रहासाठी आपोआपच साधना होत राहते. वेगळी अशी साधना करायला लागत नाही. कारण जाणून घेण्यासारखे असे काहीच शिल्लक राहात नाही.

२) धर्मशील आणि धर्मात्मा यात काही अंतर नाही. धर्मात्म्याचेच दुसरे नाव धर्मशील असे आहे.

३) विषयात आसक्त असणारा मनुष्यदेखील धर्मात्मा असू शकतो. धर्मात्म्यापेक्षा देखील विरक्त मनुष्य जास्त उच्च कोटीचा. सकाम भावाने धर्मपालन करणारा मनुष्य स्वर्गाला जातो, पण विरक्त मनुष्य खऱ्या अर्थाने मुक्त होतो. ऐहिक पदार्थांमध्ये आसक्ती नसल्याने विरक्त माणूस हा धर्मात्माही असतोच, परंतु धर्मात्म्यात वैराग्य असेलच असे नाही; म्हणून विरक्त मनुष्य हा धर्मात्म्यापेक्षा श्रेष्ठ आहे.

४) शास्त्रांचा ज्ञाता आणि 'परोक्षज्ञानी', दोघेही ज्ञानी आहेत; परंतु जीवन्मुक्त हा या दोघांपेक्षा उच्च कोटीचा. कारण तो अपरोक्ष-ज्ञानी असतो. 'परोक्षज्ञान' त्यात अंतर्भूत आहे.

५) ब्रह्मलीन राहणाऱ्या विज्ञानी पुरुषांना अभेदरूपाने निर्गुणाची प्राप्ती

होते. संत तुलसीदासांनी त्या विज्ञानी पुरुषापेक्षासुद्धा निष्ठावान भक्ताला श्रेष्ठ मानले आहे. म्हणूनच भक्ती सर्वश्रेष्ठ मानली आहे. परंतु श्रीशंकराचार्यादी महापुरुषांनी विज्ञानी पुरुषच सर्वश्रेष्ठ मानला आहे. याबाबतीत मतभेद आहेत, परंतु आमच्या मते विज्ञानी आणि अनन्य भक्त या दोघांचे स्थान सारखेच. कारण विज्ञानी पुरूषास ब्रह्मप्राप्ति अभेदरूपाने होते आणि अनन्य भक्तास सगुणरूपात. दोघेही मुक्त आहेत, दोघेही श्रेष्ठ आहेत.

सर्वांना रामराम. निरंतर ईशस्मरण एवं नामजप करीत कर्म करीत राहावे.

## ८

**महोदय,**

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. सगळीकडे आणि सगळ्या वस्तुमात्रात भगवान रामाचे दर्शन होणे ही खरोखरीच मोठी भाग्याची गोष्ट आहे. यात वेडेपणा कसला ? अशी स्थिती प्राप्त झालेल्या साधकाने तर, 'आपल्यावर ही परमेश्वराची कृपाच आहे,' असे समजून कृतज्ञभावाने त्याच्या प्रेमात मग्न झाले पाहिजे. देवापाशी कोणतीही ऐहिक वस्तू मागणे हे सकामच. मग ती वस्तू कोणासाठीही असो. परमेश्वर अंतर्यामी आहे, म्हणून तो जे काही करतो, त्यातच साधकाचे परमहित निहित असते. असा दृढ विश्वास मनात बाळगणारा साधक परमेश्वराकडे कोणतीही वस्तू मागेलच कसा? देवावर अवलंबून राहणाऱ्या भक्ताचे सारे ऋण फिटून जाते. त्याचे पितर कृतार्थ होतात, मग त्याला वंशपरंपरेची जरूरच काय?

आता स्त्रीच्या आग्रहाच्या बाबतीतच बोलायचे झाले, तर तिने अजाणतेपणी किंवा मोहवश आग्रह केलाच तर त्याला काही महत्त्व नाही. म्हणून देवाच्या गुण-प्रभावाची ओळख असणाऱ्या निष्काम भक्ताला काही मागणे करायची इच्छाच होत नाही. आणि त्यातूनही त्याने काही मागितलेच तर त्यात गैर असे काही नाही. दुसऱ्या कुणाला मागण्यापेक्षा देवावर विश्वास ठेवून त्याला मागितलेले बरे.

## ९

**महोदय,**

प्रेमपूर्वक हरिस्मरण. आपले कार्ड मिळाले, मजकूर समजला. 'सोऽहम्' मंत्राविषयी आपण विचारणा केली आहे. वेदांत-सिद्धांतानुसार हा मंत्र निर्गुण-निराकार अशा परब्रह्म परमात्म्याच्या उपासनेसाठी अधिक उपयोगी आहे. याचा अर्थ आहे, 'मी तोच आहे'. दुसऱ्या शब्दात, परब्रह्मस्वरूप परमात्मा आणि जीवात्मा यात वरकरणी जो भेद प्रतीत होतो, तो मायाजन्य आहे, वास्तविक नाही.

सगुण साकार परमेश्वराच्या साक्षात्काराची आपली जी इच्छा आहे, त्यासाठी ज्या रूपात आपण हे दर्शन घेऊ इच्छिता, त्याच्याच नावाचा जप करणे अधिक लाभदायक होईल.

आपण जो श्लोक लिहिला आहे, त्याचा अर्थ असा - 'जो चराचरात व्याप्त आहे, पण स्वत: अक्रिय आहे, जो अज्ञानरूपी अंधकाराचा नाश करणारा व ज्ञानरूपी प्रकाशाचा पुंज आहे, अशा त्या समस्त प्राण्यांच्या हृदयात वास करून राहणाऱ्या परमात्मारूप हंसाला माझा नमस्कार असो.'

## १०

**प्रेमपूर्वक हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. आपण आपली ओळख करून देताना म्हटले आहे की, आपले हिंदीचे ज्ञान त्रोटक आहे. काही हरकत नाही. आपण जशी हिंदी लिहिता त्यावरून सारा बोध होतो. त्यात आम्हांला काही त्रास नाही.

आपण 'कल्याण' घेता. चांगली गोष्ट आहे. त्यात आमची कृपा कसली ? हे आपल्याच प्रेमाचे द्योतक आहे.

आपण लिहिले आहे की, 'माझे मन ताब्यात राहात नाही आणि तास-दोन तास रामनाम घेतल्यावर ते निर्मळ राहाते.' चांगले आहे. रामनामाचा महिमा अपार आहे. तो थोड्याथोडक्या शब्दात वर्णन करता येण्यासारखा

नाही. सगळ्या प्रकारच्या आध्यात्मिक उन्नतीसाठी रामनामासारखे श्रेष्ठ साधन नाही. म्हणून आपण निरंतर रामनामाचा अभ्यास करावा. रामाच्याच कृपेने हा अभ्यास लवकरच आत्मसात होईल.

'माझे मन सदा रामनामी रमू दे, रामभक्ती आणि रामप्रेमाची ज्योत माझ्या हृदयात निरंतर तेवत राहो आणि माझी ही पिपासा इतकी वाढो की, माझे देहभान हरपून जाऊ दे, ' ही आपली इच्छा खरोखरच उत्तम आहे. त्यासाठी आपणास माझ्या किंवा कुणाच्याच मदतीची आवश्यकता नाही. या पिपासेतच अतुलनीय शक्ती आहे. म्हणून ही पिपासाच इतकी तीव्र करा आणि दृढ विश्वास ठेवा की, 'परमेश्वर माझा आहे व मी परमेश्वराचा, म्हणून तो माझी ही तीव्र इच्छा निश्चितच पूर्ण करील'. जोपर्यंत ही इच्छा पूर्ण होत नाही, तोपर्यंत निरंतर प्रतीक्षा करीत राहावे.

आपण माझ्याविषयी लिहिले आहे, हा आपला प्रेमभाव आहे. मी स्वत:ला एक सामान्य मनुष्य समजतो. रामापेक्षा अधिक तर नाहीच पण मी त्याची लेशमात्रसुद्धा बरोबरी करू शकत नाही. संत तुलसीदासांनी ज्या रामभक्तांना 'रामाहून अधिक' म्हटले आहे, त्या रामभक्तांना माझे शतवार वंदन.

राम-भेटीच्या वाटेवर वणवण फिरणाऱ्याला भगवान राम स्वतः सर्वप्रकारची मदत करायला तत्पर असतात. श्रीराम स्वतः त्याला कुठल्या ना कुठल्या प्रकाराने मार्गदर्शन करतात. म्हणून यत्किंचितही काळजी न करता आपण त्यांच्या भजन-ध्यानात तल्लीन राहा.

## ११

**प्रेमपूर्वक हरिस्मरण.**

आपल्या प्रश्नांची उत्तरे खालीलप्रमाणे.

(१) शास्त्रात मुक्तीचे अनेक प्रकार सांगितले आहेत. जो जीव ब्रह्मलोकी जातो, तो नव्या कल्पात पुनः जन्म घेतो; परंतु सायुज्य मुक्ती आणि ब्रह्मलीन मुक्ती प्राप्त झालेले लोक पुनः मृत्युलोकात प्रवेश करीत नाहीत.

'सर्व जीवांची मुक्ती झाली, तर सृष्टी नष्ट होईल' अशी जी शंका आपण व्यक्त केली आहे, त्याचे उत्तर असे की, जीव परिमित नाही. ईश्वर सर्वज्ञ आहे आणि संपूर्ण जगत् त्याच्यात सामावले आहे, तरीही त्याच्याच संकल्पामुळे जीवसंख्या अनादी-अनंत आहे. म्हणून ती समाप्त होत नाही. इतक्या तर्कानेदेखील हे रहस्य कुणाच्या बुद्धीला उलगडत नसेल आणि त्याच्या दृष्टीने जीवसृष्टी समाप्त होणे शक्य असेल तरीही काय बिघडते ? समस्त प्राणिमात्रांस या सृष्टीपासून मुक्ती मिळाली तर चांगलेच आहे. पुनरावर्तनावर आधारित मुक्तीसुद्धा स्वर्गासारखीच अल्प आणि अनित्य झाली तर तिचे काहीच महत्त्व नाही.

(२) सांख्य सिद्धांतानुसार प्रकृती परिणामशील असूनसुद्धा सर्वस्वी निरवयव नाही. ती साम्यावस्थेत अवयवरहित व परिणामी सावयव आहे. म्हणून सांख्यशास्त्राला तिची दोन्ही रूपे मान्य आहेत.

प्रकृतीमध्ये परिणाम दोन प्रकारांनी होतो. एक कारणातून कार्याची परिणती आणि दुसरे कार्यातून कारणाची परिणती. प्रकृतीमध्ये या दोन्ही प्रकारचे परिणाम निरंतर चालू असतात. देश आणि काल हे प्रकृतीचे अंशमात्र आहेत, म्हणून ती देश-कालातही व्याप्त आहे. याच कारणाने तिची सूक्ष्मता आणि व्यापकता दोन्ही देशकालाबाधित आहे.

(३) तिन्ही गुणांची साम्यावस्था म्हणजे प्रकृती. दुसऱ्या शब्दात, जेव्हा तिन्ही गुण मूळ प्रकृतीमध्ये विलीन असतात, तेव्हा ते अभिव्यक्त होत नाहीत, हीच त्रिगुणसाम्यावस्था. उलटपक्षी जेव्हा परमेश्वरी संकल्पाने प्रकृतीचा क्षोभ होऊन त्रिगुणांची अभिव्यक्ती होते, ती त्यांची विषमावस्था. गुणांच्या साम्यावस्थेतून विषमावस्थेत आणि विषमावस्थेतून साम्यावस्थेत होणाऱ्या परिवर्तनालाच परिणाम असे म्हणतात. हा त्यांचा स्वभाव आहे आणि दोहोंपैकी कोणता ना कोणता परिणाम दिसून येणे स्वाभाविकच आहे.

(४) अद्वैत वेदांत-सिद्धांताचे अनेक प्रकार आहेत. कुणी अजातवाद मानतात तर कुणी बिंबवादाचे अनुयायी आहेत, तर कुणी परिणामवादाचे

पुरस्कर्ते... वगैरे वगैरे. हा फार गहन विषय आहे. पत्राद्वारे समजावणे कठीण आहे. या विषयाचे शास्त्रोक्त अध्ययन केल्यास तो समजू शकेल.

अशा मत-मतांतराचा उलगडा तर्काच्या आधाराने होणे कठीण आहे. कुठल्यातरी एका मताचे अनुसरण करून जेव्हा मनुष्य त्यानुसार साधनेत लीन होतो, तेव्हा तो आपोआप सर्व मतांच्या विलयबिंदूवर जाऊन पोहोचतो आणि सर्व शंका समूळ नष्ट होतात. कारण सर्व मतांच्या जनकांचा एकच उद्देश आहे, तो म्हणजे 'जीवास उच्चतम स्थितीस पोहोचविणे.

## १२

**मान्यवर महोदय.**

सादर हरिस्मरण. आपले पत्र वेळेवर मिळाले होते, परंतु समयाभावामुळे उत्तरास उशीर होतो आहे.

आपण ईशभक्ती आणि ईशप्रेमाचा महिमा वर्णन केला आणि ज्ञान व कर्म ही त्याची साधने आहेत असे म्हटले आहे. परंतु ज्या पराभक्ती आणि अनन्य-भक्तीच्या योगाने मनुष्य ईश्वरास तत्त्वरूपात ओळखून त्याच्यात विलीन होतो, ते ज्ञानही तर पराभक्तीचेच फळ आहे (गीता-१८.५५). अशा ज्ञानाचे महत्त्व भगवंतांनी गीतेच्या चौथ्या अध्यायातील ३८ व्या श्लोकात सांगितले आहे. त्यात त्यांनी कर्मयोग हा स्वतंत्र मार्ग असल्याचे सांगून, तत्पूर्वी २४ व्या श्लोकात ज्ञानयोग हाही ईशप्राप्तीचा मार्ग असल्याचे म्हटले आहे. आपण जसे मनाला पटेल तसे मानावे, कारण गीतेत सर्व धारणांना आधार आहे. परंतु कर्मयोग आणि ज्ञानयोग ही ईशप्राप्तीची स्वतंत्र साधने नाहीत, असे मी मानीत नाही.

तेराव्या अध्यायातील २४ व्या श्लोकात कुठेही 'उपासते' हे पद आले नाही. तेराव्या अध्यायातील २५ व्या श्लोकात ते आले आहे, आणि ते योग्यच आहे; कारण मोठ्यांचा सल्ला ऐकून त्यानुसार साधनारत होणे आवश्यक आहे आणि 'उपासते'चा अर्थ प्रेम किंवा भक्ती असा नाही. संदर्भानुसार त्याचा अर्थ विशिष्ट साधना-मार्गाच्या उपासनेशी जोडला जावा.

आपण जर ईशप्राप्ती किंवा मुक्ती म्हणजेच भक्ती असे मानता, तर ते सर्व प्रकारच्या साधनेचे फळ आहे. मग त्यात आणखी समालोचना करण्याची आवश्यकता नाही. संत तुलसीदास तर असे भक्त होते की, ज्यांनी मुक्तीला तुच्छ लेखून भक्तीला प्राधान्य दिले. म्हणून त्यांनी भक्तीची कितीही प्रशंसा केली तरी थोडीच आहे. परंतु जेव्हा ते मुक्तीच्या मार्गांचे वर्णन करतात, तेव्हा ते ज्ञानास पण भक्तीसारखाच मुक्तीचा स्वतंत्र मार्ग नक्कीच मानतात. '**ज्ञानहि भक्तिहि नहिं कछु भेदा । उभय हरहिं भव संभव खेदा ॥** या पंक्तीमध्ये वरील गोष्ट स्पष्ट होते. जेव्हा ते म्हणतात की, '**बिनु हरिभजन न भव तरिअ यह सिद्धांत अपेल,**' तेव्हा त्यांच्या मान्यतेनुसार 'ज्ञानयोगाचा आत्मस्वरूप-चिंतनरूप ध्यास' हेही भजनाचे एक रूप आहे, असे समजावे.

(२) गीतेच्या बाराव्या अध्यायातील १२ व्या श्लोकाचा मला जो अर्थ विदित आहे, त्याचे सविस्तर विवेचन मी 'तत्त्वविवेचनी' टीकेत केले आहे, ते पहावे. मी असे म्हणत नाही की, कर्मयोगी भक्तिहीन असतो. याउलट मी याआधीच स्पष्ट केले आहे की, एखाद्या कर्मयोग्याच्या साधनेत भक्तीला प्राधान्य असते आणि एखाद्याच्या साधनेत ती गौण असते. ज्यामध्ये भक्ती आणि प्रेमभाव हे प्रमुख आहेत तो भक्तियोग आणि ज्यात केवळ निष्कामभावाला प्राधान्य आहे तो कर्मयोग. दोन्हीही मुक्तीचे मार्ग आहेत. गीतेच्या दुसऱ्या अध्यायातील ३९ व्या श्लोकापासून अध्यायाच्या शेवटपर्यंत कर्मयोगाचे वर्णन आहे, ते ध्यानपूर्वक पाहावे. त्यात भक्तीला प्राधान्य दिलेले नाही.

आपण भगवद्भक्ताबद्दल लिहिले आहे की, 'तो मुक्तीला ठोकर मारतो, म्हणून त्याच्यासारखा त्यागी तोच' - हे अगदी खरे आहे. याने हेच सिद्ध होते की, भक्तीसाधनेत निष्काम-भावाला सकाम भक्तीपेक्षा वरचा दर्जा प्राप्त आहे. गीतेत पण जागोजाग हीच शिकवण मिळते. मी तरी कर्मयोगात क्रियेपेक्षा निष्काम भावालाच महत्त्व देतो. तसे भगवद्भजनही कर्मच आहे. कारण क्रियेवीण साधना शक्यच नाही. म्हणून तर गीतेत

भगवंतांनी स्पष्ट म्हटले आहे की, सगळे यज्ञही कर्मजन्य मानावेत (गीता ४.३२) अर्थात् भक्ती ही कर्मयोगाहून वेगळी नाही.

मी कधीही 'कर्माला' मुक्तीचे साधन म्हटले नाही, 'कर्मयोगाला' मुक्तीचे साधन म्हटले आहे. कर्मयोगाच्या फलस्वरूप मिळणाऱ्या ज्या ज्ञानाबद्दल उल्लेख आहे ते ज्ञान, ज्ञानयोग, भक्तियोग आणि कर्मयोग या तिहींचे संयुक्त फळ आहे. ते प्राप्त झाले की मनुष्य कृतकृत्य होतो. नंतर आणखी काहीही करणे शिल्लक राहात नाही.

आपल्या कथनानुसार जर भक्तीचा अर्थ 'सेवा', आणि ज्ञानाचा अर्थ 'जाणणे' असा असेल, तर मग भगवंतांनी 'भक्त्या मामभिजानाति' असे जे म्हटले आहे त्याचा अर्थ लक्षात घ्यायचा प्रयत्न करावा. इथे 'भक्तीद्वारे (तो) भगवंतास जाणतो', असे म्हटले आहे, 'आधी जाणून घेऊन मग भक्ती करतो' असे नाही.

माणसाला या जन्मानंतर दुसरा जन्म नसतो, हे मला पटत नाही. अज्ञानी माणसांना कितीतरी वेळा मनुष्यशरीर प्राप्त झाले असेल. जर योगभ्रष्ट माणसाचादेखील पुनर्जन्म होऊ शकतो, तर दुसऱ्यांच्या- बद्दल बोलायलाच नको. मला तरी असे वाटते की, ज्ञानी मनुष्य कर्मवश पुन: जन्माला येत नाही. आणि ज्याला पुनर्जन्म प्राप्त झाला तो ज्ञानी नव्हेच.

## १३

**प्रेमपूर्वक हरिस्मरण.**

आपली पत्रे मागेच मिळाली होती. समयाभावामुळे पत्रोत्तरास विलंब होत आहे. आपल्या पत्रांची उत्तरे खालीलप्रमाणे.

(१) श्रीव्यासकृपेने प्राप्त झालेल्या दिव्य दृष्टीमुळे संजयाने श्रीकृष्णार्जुन-संवादरूप गीतामृत ऐकले, पाहिले आणि ते तसेच धृतराष्ट्राला ऐकवले, हे गीतेवरूनच स्पष्ट होते. जिथे असेल तिथून सगळ्या घटना पाहण्याची, ऐकण्याची आणि समजण्याची शक्ती संजयाला मिळालेली होती.

(२) महाभारत आणि गीतेची श्लोकबद्ध रचना युद्धकाळात नाही

झाली, त्यानंतर झाली, असे महाभारतात स्पष्ट लिहिले आहे. असे मानायचे कारण नाही की, भगवान कृष्णांनी हा दिव्य उपदेश अर्जुनाला एकदम सगळा श्लोकबद्ध सांगितला आणि संजयाने पण धृतराष्ट्रास श्लोकबद्धच ऐकवला. त्यावेळी तर या गोष्टी बोलाचालीच्या भाषेतच झाल्या. अधूनमधून तसेच्या तसे श्लोक पण सांगितले गेले असतील. गीता सध्या आपल्यासमोर ज्या रूपात आहे, ती निश्चितच दिव्यानुभवी श्रीव्यासांची रचना आहे.

(३) भगवान कृष्णांनी अर्जुनाला जे विश्वरूप दर्शन दिले ते आपल्या शरीरातच दिले. जे विश्व आपल्याला बाह्येंद्रियाद्वारे प्रतीत होते, तेच कृष्णाने आपले रूप म्हणून दाखविले, असे मानायचे कारण नाही. अकराव्या अध्यायातील श्रीकृष्णाच्या वचनांनी ही गोष्ट स्पष्ट होते. ते रूप भगवंतांनी साडेतीन हाताच्या देहातच स्वेच्छेने दाखविले तर त्यात आश्चर्य कोणते? सामान्य मनुष्यसुद्धा जर छोट्याशा दुर्बिणीत मोठमोठी दृश्ये सामावून दाखवू शकतो, तर मग देवासाठी असंभव असे काहीच नाही. देवाचे ते विश्वरूप दर्शन अर्जुन आणि संजय यांच्याखेरीज आणखी कुणाला झाले नाही, हेही गीतेतील वर्णनावरूनच स्पष्ट होते. अर्जुन याच जगात, श्रीकृष्णाशेजारी रथारूढ होता. त्याने बाकी सर्वांच्याबरोबर स्वत:ला पण कृष्णाच्या शरीरात पाहिले की नाही याचे वर्णन गीतेत नाही. भागवतात, जिथे यशोदेला श्रीकृष्णाच्या मुखात विश्वरूप दर्शन झाल्याचा उल्लेख आला आहे तिथे मात्र तिने स्वत:चे रूपही त्याच्या मुखात पाहिल्याबद्दल लिहिले आहे.

## १४

**सादर साभिवादन हरिस्मरण.**

आपले पत्र वेळेवर मिळाले. मजकूर समजला. आपण आपला परिचय देऊन, मला स्वर्गाश्रमात येऊन भेटण्याबद्दल लिहिले आहे. ठीक आहे.

आपण गीतेची तत्त्वविवेचनी टीका संपूर्ण वाचली. चांगले वाटले. ती

वाचून आपला खूप फायदा झाला, ही देवाची कृपा. देव कुणाला तरी निमित्त करूनच आपला कृपाप्रसाद वाटतो.

आपण सकाम भक्तीविषयी लिहिले आहे. देवावर विश्वास नसल्यामुळे ऐहिक वस्तूंच्या प्राप्तीसाठी सांसारिक माणसांची सेवा आणि खुशामत करणाऱ्यांच्यापेक्षा देवावर श्रद्धा ठेवणारे सकाम भक्त खूप चांगले. पण देवाचे गुण, स्वभाव व प्रभाव यांचा अनुभव असलेल्या, देवालाच आपले मानणाऱ्या आणि ऐहिक भोग तथा आप्तांशी अनासक्ती असणाऱ्यांच्या मनात सांसारिक वस्तूंची इच्छाच होणार नाही. कारण त्यांच्या दृष्टीने त्यांची आवश्यकताच नाही. त्यांचे सर्व क्रियाकलाप देवासाठी, त्याच्याच सेवेच्या रूपात, निष्काम भावाने होत राहातात.

आपण उपासनेसंबंधी ग्रंथांबद्दल विचारणा केली आहे. श्रीमद्भगवद्गीतेखेरीज श्रीतुलसीदासरचित सर्व ग्रंथ भक्तीच्या शिकवणीने ओतप्रोत आहेत, तसेच श्रीमद्भागवतातदेखील उपासनेविषयी भरपूर लिहिले आहे.

ईश्वर आपल्या सर्व शंकांचे निवारण करतो, आपल्याला सगळ्या कामात यश देतो आणि स्वप्नात सारे कांही सांगतो ही त्याची कृपा. पण एवढ्याने संतुष्ट होऊन स्वत:ला फार श्रेष्ठ समजू नये. ही तर देवाची स्वत:कडे आकर्षित करायची नेहमीची पद्धत आहे, हे लक्षात घेऊन, माणसाने स्वत:स कृतज्ञ मानून त्याच्या उपकारांचे नेहमी स्मरण करून, ईशप्रेमात व्याकुळ होऊन त्याचा साक्षात्कार आणि संपूर्ण ज्ञान यांसाठी विव्हळ होणे, अधिक श्रेयस्कर.

## १५

**सादर नमस्कार.**

आपले पत्र मिळाले. समयाभावामुळे पत्रोत्तरास उशीर झाला, त्याचा राग मानू नये. आपल्या प्रश्नांची उत्तरे खालीलप्रमाणे.

(१) आपण विचारले आहे की, तलावातल्या एका माशाला उचलताना एका पक्ष्याला आपण पाहिले आणि माशाला वाचवण्यासाठी पक्ष्याला

हटकणार, एवढ्यात त्याच्याच चोचीने जखमी झालेल्या माशाला जगवायचे कसे, असा विचार मनात आला. अशा अवस्थेत काय करायला हवे ? माशाला सोडवून पक्ष्याला भुकेले ठेवावे, की या घटनेकडे लक्षच देऊ नये ? याचे उत्तर असे की, आपला प्रयत्न असा हवा की, पक्ष्याने मासा पकडूच नये. जर त्याने तो पकडला आणि मासा अर्धमेला झाला, तर त्याच्या जिवात जीव असेपर्यंत त्याला वाचवायचा प्रयत्न करावा. पण ती शक्यता नसेल, तर त्या माशाला पक्ष्यापासून वाचवायचा प्रयत्न करू नये.

(२) आपण लिहिले आहे की, दिव्याजवळ पाल, किडे पकडण्यासाठी टपून बसलेली दिसली तर किड्यांना वाचवायला तिला हटकावे का ? पालीला भक्ष्यही तर मिळाले पाहिजे. किड्यांना वाचविण्यासाठी पालीला हाकलीत राहावे, का मारावे, का उदासीन राहावे ? या संदर्भात असे म्हणता येईल की, जिथे भक्ष्य आणि भक्षक दोन्ही विद्यमान आहेत तेथे भक्षकाची काळजी करायचे कारण नाही. दुर्बलाचेच संरक्षण करावे. जर दिवा मालवण्याने किड्यांचे रक्षण होत असेल तर दिवा मालवावा, पण पालीला मारायचा आपल्याला अधिकार नाही. दिवा ठेवणे आवश्यकच असेल तर पालीला हाकलावे.

(३) 'हिंडणाऱ्या-फिरणाऱ्या जीवजंतूंची हत्या होऊ नये म्हणून हिंदू मनुष्य स्वाभाविकच काळजी घेतो. परंतु जिवंत वनस्पती तोडण्याच्या किंवा खाण्याच्या बाबतीत मनाला कसे समजावणार ? निर्वाहासाठी काही तरी खाल्लेच पाहिजे, त्यामुळे वनस्पतिहत्या टाळणे अशक्य आहे.' - हे आपले म्हणणे बरोबर आहे. फळे, कंदमुळे, भाजीपाला, धान्ये इत्यादी खाद्य पदार्थांमध्ये कोरड्या धान्याला तर काहीच त्रास होत नाही. कारण त्यात पाणी-माती यांच्या संपर्कानंतर अंकुरण झाल्यानंतरच जिवंतपणा येतो, असे मानले जाते. तोपर्यंत ते मृतप्राय असल्याने, त्याला दु:ख होत नाही. म्हणून त्या संदर्भात हत्या मानायचे कारण नाही. बाकी फळे, कंदमुळे, भाजीपाला यांना कापण्याने पण फार त्रास होत नाही. कारण ते बेशुद्धावस्थेत असल्यासारखेच असतात. म्हणून ती किंचित हिंसा समजावी. म्हणूनच त्यांचा उपयोगही माणसाने शरीरनिर्वाहासाठी कमीत कमी करावा.

(४) आपण विचारले आहे की, '**रामः शस्त्रभृतामहम्**' यात एका टीकाकाराने 'राम' शब्दाचा अर्थ 'परशुराम' असा घेतला आहे, 'दशरथपुत्र राम' असा का नाही ? याचे उत्तर ज्यांनी टीका केली, ते टीकाकारच देऊ शकतील.

(५) आपले म्हणणे आहे की, 'कपटकर्मात मी जुगार आहे' या कथनाने आसुरी प्रवृत्तीच्या लोकांना प्रोत्साहन मिळते. खरे तर, यात प्रोत्साहन मिळण्याचा काहीच प्रश्न नाही. कारण याचे तात्पर्य एवढेच आहे की, 'जी जी तेज:पुंज, कांतिमय वस्तू आहे, ती मी आहे.' अर्थात् जे जे चांगले, वाईट आहे ते सगळे परमेश्वरमात्र आहे. थोर पुरुषांचे वर्णन करताना भगवान म्हणतात की, यातील जे काही उत्तम आहे, ते मी आहे. थोडक्यात त्यांनी असे सिद्ध केले आहे की, ही सारी माझ्या अंशमात्राची अभिव्यक्ती समजावी. (गीता १०.४१).

(६) आपण लिहिता की, 'भगवदर्पणाची कल्पना हृदयात टिकत नाही.' खरे तर त्यासाठी निष्कपट अंत:करणाने, करुणार्द्र वाणीने परमेश्वराची विनवणी करायला हवी.

(७) आपण लिहिले आहे की, ''परमेश्वराची छबी मनात टिकत नाही, तरी आपण खूप वेळा, 'हे माझ्या सर्वस्वा, हरे कृष्णा, हरे कृष्णा' आदी वाक्ये घोकत राहता, आणि यात काही चूक आहे का,'' अशीही पृच्छा आपण केली आहे. आपण व्यक्त केलेली ही भावना खरोखरीच श्रेष्ठ आहे. आपली देवाविषयी ही जी भावना आहे ती उत्तम आहे. श्रद्धेने आणि प्रेमपूर्वक ध्यान करण्यात काही चूक झाली तरी ती हळूहळू आपोआप लोप होईल. शेष भगवत्कृपा.

## १६

### प्रेमपूर्वक हरिस्मरण.

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. आपण लिहिले आहे की, 'ज्याचे जे आराध्य दैवत असेल, त्याच्याच नावाचा त्याने जप करावा,

असा विचार मनात वारंवार उद्भवतो, त्याचे निरसन होत नाही.' हा तर उत्तम विचार आहे. निरसनाची जरूरच नाही. संत तुलसीदास भगवान श्रीकृष्ण आणि श्रीराम यांच्यात काहीच फरक मानीत नसत, पण उपासना मात्र श्रीरामरूपाचीच करीत असत. जेव्हा ते वृंदावनास गेले, तेव्हा भगवान श्रीकृष्णाच्या मंदिरात देवासमोर त्यांनी हा दोहा म्हटला -

**कहा कहौं छबि आजु की भले बने हो नाथ।**
**तुलसी मस्तक तब नवै जब धनुषबान लौ हाथ॥**

यावरूनही हे स्पष्ट होते की, संत तुलसीदासांच्या दृष्टीने श्रीराम आणि श्रीकृष्ण यांच्यात कोणताही फरक नव्हता, तरी पण त्यांचे इष्ट रूप श्रीरामाचेच होते.

आपण आपली मागील स्थिती लिहून, नाम आणि मंत्र यासंबंधी माझी संमती विचारली आहे. श्रीविष्णु-रूपाच्या उपासकांसाठी निम्नलिखित मंत्रांचे विधान आहे. भक्त ध्रुव भगवान विष्णूच्या शंखचक्रगदापद्मधारी चतुर्भुज रूपाचे ध्यान करीत आणि '**ॐ नमो भगवते वासुदेवाय**' या द्वादशाक्षरी मंत्राचा जप करीत असत. हा उपदेश त्यांना नारदमुनींकडून मिळाला होता. याशिवाय '**ॐ नमो नारायणाय**' आणि '**ॐ विष्णवे नमः**' या मंत्रांचा उल्लेख पण मिळतो. या तिन्हीमधील आपल्याला जर '**ॐ विष्णवे नमः**' हा मंत्र अधिक आवडत असेल तर माझ्या मते, आपल्यासाठी तोच अधिक श्रेयस्कर. निष्ठेने आणि निःशंकभावे या मंत्राच्या जपाला सुरुवात करा. अष्टाक्षरी आणि द्वादशाक्षरी मंत्रांचे जे फळ शास्त्रात लिहिले आहे, तेच फळ आपल्याला या मंत्रांच्या जपाने मिळू शकेल.

श्रीविष्णू, श्रीकृष्ण आणि श्रीराम या तिन्ही नावात काही फरक नाही. प्रसंगानुरूप कुठेही या तिन्हीमधील कुठल्याही एका नामाच्या जपाचे जे फळ सांगितले, असेल तेच तिहींच्या बाबतीत समजावे. भागवतामधील जो श्लोक आपण श्रीकृष्णाच्या नामाच्या संदर्भात वाचला, तो श्रीविष्णूच्या नामाच्या बाबतीतही तितकाच लागू आहे असे समजावे. याविषयी आपली जी धारणा आहे ती बरोबर आहे. आपणासाठी '**ॐ विष्णवे नमः**' हा मंत्र निश्चितपणे खूपच उपयोगी आहे.

आपल्या प्रश्नांची उत्तरे खालीलप्रमाणे.

(१) आर्यसमाज आणि सनातनधर्माच्या अनुयायांमधील मतभेद पाहून आपण खिन्न व्हायचे कारण नाही. वेळोवेळी असे मतभेद उद्‌भवत राहतात. त्यात गैर असे काहीच नाही; उलट त्याने धार्मिक भावना जिवंत राहते. आर्यसमाजाचे प्रवर्तक स्वामी दयानंद यांना पुराण मान्य नव्हते. तरी भगवत्तत्व, सत्य आदि जे गुण त्यांना मान्य होते, त्या गुणांचे, पुराणाच्या ज्या भागात समर्थन केले गेले आहे, ते त्यांना मान्य होतेच. पुराणातल्या बऱ्याच गोष्टी फार महत्त्वाच्या आहेत आणि सर्वांना मान्यही आहेत, यात संशय नाही.

आता देवी-देवतांच्याबद्दल बोलायचे तर मला वाटते, त्यांचे वर्णन जसे पुराणांत आहे तसेच वेदांतदेखील आहे; फक्त वेदांत जे संक्षेपात लिहिले आहे ते पुराणांत कथारूपात सविस्तर वर्णन केले आहे. अधिकतर उपनिषदे ब्राह्मण भागातील आहेत आणि काही संहितांमधून आली आहेत. उदाहरणार्थ - **'ईशावास्योपनिषद्'** हे शुक्लयजुर्वेदाचा अंतिम चाळिसावा अध्याय आहे.

(२) अवतारवादास वेदांचे समर्थन आहे. या संदर्भातील प्रमाणे पत्रामध्ये कुठवर म्हणून लिहायची? केनोपनिषदात इंद्रादी देवतांच्या संमुख परमेश्वर यक्षरूपात प्रकट झाल्याचा प्रसंग आला आहे.

## १७

**प्रेमपूर्वक हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. ज्या संतांच्या पायाच्या कृपेने पापी माणसाचे मन देखील शुद्ध होते, त्या संतांना माझा नमस्कार. मी एक सामान्य माणूस आहे, तेव्हा मला मित्रासमान मानून रामराम किंवा हरिस्मरण लिहावे; प्रणाम वगैरे लिहू नये. शरण जाण्यास योग्य फक्त परमेश्वर आहे, त्यालाच शरण जावे. ईश्वरी साक्षात्कार त्याच्याच अहैतुक कृपेने होतो. त्याची तशी कृपा मनुष्यमात्रावर आहेच. जो मनुष्य एकमेव त्याच्याच

साक्षात्कारासाठी आतुर होतो, त्याच्यावर परमेश्वराची कृपादृष्टी जरूर होते. त्याच्या ठायी पूर्ण विश्वास बसल्यावर आणि त्याच्याबद्दल आपुलकी निर्माण झाल्यावर त्याच्या दर्शनाची विरहव्याकुळता आपोआप निर्माण होते. केवळ त्याच्या विश्वासानेच प्रेम निर्माण होते आणि विकसित पण होते.

आपण लिहिले आहे की, 'मी कधी नामजप करतो आणि कधी नाही. कधी कधी मन स्थिर होत नाही. प्रयत्न करूनही यश मिळत नाही. जप करावयास सुरुवात केली की, थोड्याच वेळात झोप यायला लागते.'- ही सगळी लक्षणे, विश्वास आणि प्रेम यांची कमतरता दर्शवितात. प्रेम असेल तर नामजप आपल्याआपण होतो, परिश्रम करायला लागत नाहीत. परमेश्वर आहे, तोच फक्त माझा आहे आणि त्याच्याखेरीज या जगात माझे कोणीही नाही' - असा दृढ विश्वास झाल्यावर, प्रेम आपोआप निर्माण होते. जे प्रेम शिथिल होत नाही आणि प्रतिक्षण वाढत जाते, तेच खरे प्रेम.

आपण लिहिले आहे की, सांसारिक व्यवहारांची आपणास नावड आहे. ही नावड जर शरीर आणि ऐहिक भोगांमध्ये लिप्त राहून असेल तर ते ठीक नाही, कारण तो अपराध आहे. पण या अरुचीबरोबर जर आपण सांसारिक भोग आणि शारीरिक सुखांच्या बाबतीत पण अनासक्त असाल, तर ती परमेश्वराची मोठीच कृपा आहे. माणसाला संसारात प्रेम वाटत नसेल, तर देवाच्या पायाशी ते अवश्य जडते. देवावर आपले प्रेम नाही याचा अर्थच असा होतो की, ते ऐहिक गोष्टींमध्ये गुंतले आहे. अन्यथा आपले मन अपराधाकडे वळले नसते. क्रोध आणि भीतीची भावना पण बळावली नसती. दुर्गणमुक्त होऊन श्रीरामचरणी अनन्य प्रेमभावना निर्माण करण्याचा उपाय आपण विचारला आहे. माझ्या मते उत्तम उपाय म्हणजे - श्रद्धापूर्वक देवाचे गुण, प्रभाव आणि श्रेष्ठता याबद्दल सत्पुरुषांची वचने ऐकावीत, त्यासंबंधी पुस्तके अभ्यासावीत आणि गंभीरपणे मनन-चिंतन करून ती मनात ठसवावीत.

रामायणाचे मासपारायण करणे हा उत्तम उपाय आहे. त्याबरोबर

प्रत्येक दोहा, छंद, सोरठा आणि चौपाई यांचा अर्थ नीट समजावून घेऊन, जिथे जिथे देवाच्या गुण-प्रभाव-रूपाचे वर्णन येईल, त्यावर भावयुक्त होऊन स्थिरचित्त झाले तर अधिक लाभ होईल. रामायणातील कोणत्याही भागाचा पाठ असाच करावा.

अधिक थंडीमुळे स्नान करणे जर आरोग्यास अपायकारक वाटत असेल, तर त्याशिवायदेखील रामायण-पाठ करायला हरकत नाही. त्यासाठी पाठ बंद करायचे कारण नाही.

गळ्यात जानवे नसेल तर संध्या आणि गायत्री-जप करू नये.

गीताप्रेस द्वारा प्रकाशित '**श्रीप्रेमभक्तिप्रकाश**' नामक पुस्तकात पूजाविधीबद्दल थोडक्यात लिहिले आहे.

## १८

**प्रेमपूर्वक हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. जेव्हा आपण कारुण्यपूर्ण रुदन करीत ईशस्तवन करता, तेव्हा आपणास भगवत्कृपेचा विशेष अनुभव येतो, हे फारच उत्तम. ईशकृपा ही सर्वांवर सारखीच असते. अनादराच्या भावनेमुळे त्याची निरंतर प्रतीती येत नाही. साधकाच्या मनात जर त्याच्याबद्दल आदरभाव राहिला, त्याच्या कृपेचा वेळोवेळी झालेला साक्षात्कार आठवून मनात कृतज्ञभाव ठेवला तर, माझ्या मते, त्याचा कृपानुभव स्थायी रूपात राहील.

आपण कामासक्तीबद्दल लिहिले आहे. भगवत्प्रेमाबरोबर ती आपल्या आपण शांत होते. जोपर्यंत मनुष्य सांसारिक भोगांना सत्य आणि सुखप्रद समजतो आणि जोपर्यंत त्यांची क्षणभंगुरता व परिणामी दुःखदायकता यांच्याकडे लक्ष जात नाही, तोपर्यंत ईशप्रेमाची प्राप्तीही होत नाही आणि भोगसक्तीचा नाशही होत नाही. म्हणून मनुष्याने ईश्वराचे गुण, प्रभाव आणि तत्त्वासंबंधीच्या गोष्टी श्रद्धेने ऐकून समजून ईश्वराच्या भजन-ध्यानात लीन होऊन मनाला ऐहिक भोगातून दूर खेचावे.

सत्संगासाठी मनाशी संकल्प करणे छानच. मनुष्यास खरा सत्संग मिळाल्यावर परमेश्वर प्रेम- होणे फार सोपे आहे. आपण सत्संगाशिवाय राहू शकत नाही, हे फारच चांगले. ही भावना आणखी दृढ आणि प्रबळ करा. भाव दृढ झाला की, फलप्राप्ती निश्चित.

आपण मला संत मानून माझ्या सोबतीत स्वत:चा उद्धार आहे असे समजता, हे आपले सौजन्य आहे. मी एक सामान्य मनुष्य आहे. माझ्यात विशेष असे काही नाही. परमेश्वर सर्वसमर्थ आहे आणि सर्वांठायी आहे. म्हणून श्रद्धाळू माणसाच्या श्रद्धेमुळे जर कुणाचा काही फायदा झाला, तर त्यात श्रद्धाळू माणसाची श्रद्धा आणि परमेश्वराची कृपा यांचेच वैशिष्ट्य आहे.

## १९

**सादर सप्रेम हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. माझ्या पत्रांमुळे आपल्याला भजन व साधनेत प्रोत्साहन मिळून तत्परता वाढली, तसेच मोठा आधारही मिळाला, असे जे आपण लिहिले आहे, ते आपल्या माझ्याबद्दलच्या प्रेमापोटी.

आपण लिहिता की, घरच्या कठीण परिस्थितीतसुद्धा आपण भजन-साधनेत नदीच्या बांधासारखे अटळ आहात आणि भविष्यात याहीपेक्षा प्रयत्नशील व्हाल, असा आपला दृढविश्वास आहे. ही खरोखरीच उत्तम भावना आहे. या भावनेला आणखी उत्कट रूप देण्याचा प्रयत्न करा. 'विपरीत विचारांच्या लोकांत समय व्यतीत करायला लागतो आणि तशा त्या अडचणी निर्माण करणाऱ्या लोकांच्यातच जीवनयापन करण्याने इच्छित ध्येय कधीच साध्य होणार नाही.' असे जे आपण लिहिले आहे, ते बरोबर आहे. आपल्या उपासनेत अडचणी निर्माण करणाऱ्यांना आपण गोडीगुलाबीने नम्र विनंती करा की, 'लंकेत राहूनसुद्धा बिभीषणाने जर ईश्वरभक्ती सोडली नाही तर मी का सोडावी ?' अशा वातावरणातील

वास्तव्य आपोआपच वैराग्यासाठी प्रवृत्त करते. याने या गोष्टीची पुष्टी होते की हा संसार एक जंजाळ आहे आणि त्यातून निवृत्त झाले पाहिजे. जे काही घडते ते ईश्वरी विधानानुसार होते, असे समजून ईश्वरभक्ती आणखी निष्ठेने केली पाहिजे.

आपण लिहिले आहे की, 'घरच्या वडीलधाऱ्या माणसांच्या उपासना-विरोधी शब्दांनी मन खिन्न होते. ही माझी परीक्षा आहे का, देवाला माझी उपासनाच मंजूर नाही?' देवाला आपली उपासना मंजूर नाही, असा विचारही आपण मनात आणू नका. हां ! असे मानू शकता की, ही माझी परीक्षा आहे आणि परमेश्वराने प्रतिकूल परिस्थिती निर्माण करून मला पापमुक्त करायचे ठरविले आहे. या विचाराची कास पकडून सगळे सहर्ष सहन करण्यातच मोठा फायदा आहे.

सत्संगातील कमतरता कबूल करून पश्चात्ताप वाटत असेल, तर सत्संगाचा प्रयत्न चालू ठेवावा. सत्संग लाभत नसेल तेव्हा सद्ग्रंथांचे अध्ययन करा आणि जेव्हा केव्हा सत्संग लाभेल तेव्हा ती ईशकृपा समजून आनंद मानावा.

**अब मोहि भा भरोस हनुमंता । बिनु हरिकृपा मिलहिं नहिं संता ।।**

आपल्या ज्येष्ठ चुलत्यांच्या हयातीत प्रभु-आराधनेत आपल्याला त्यांचा आधार होता, पण त्यांच्या निधनानंतर तो आधार संपला त्याला निरुपाय आहे. **'ईश्वरेच्छा बलीयसी !'** आता सर्वात मोठा आधार श्रीहरीचा, असे जे आपण म्हणता, ते अगदी बरोबर आहे. तोच शाश्वत आधार आहे. तो सोडू नका. प्रभूवर अवलंबून राहून भरपूर जोमाने ईशसाधना करावी.

आपण वैराग्याच्या बाबतीत जी आतुरता दाखविली आहे, ती ठीक आहे. पण विरागी झाल्यानंतर संन्यासाची आवश्यकता नाही. कारण संसारात वैराग्य असेल, तर गृहस्थधर्मात राहूनही काही अडचण नाही आणि वैराग्यभावनेचाच अभाव असेल तर संन्यासही वृथा आणि पतनकारक होतो.

आई-वडील आदी ज्येष्ठ जनांचा आदर करणे उचित मानून, त्यांना

उलट उत्तरे न देण्याची आपली सवय आहे, असे आपण लिहिता. चांगली गोष्ट आहे. 'अजून तुझे वय भजन-पूजनाचे नाही, हे सारे नंतर कर' - हे आईवडिलांचे म्हणणे मोहवश आहे. नंतर कोण करते ? उद्याची काय शाश्वती ? म्हणून ते उद्यावर न सोडता आज, आत्ताच ध्यानयुक्त होणे चांगले. ते मौजमस्ती कर म्हणतात, ते ठीक आहे; पण ही मौजमस्ती सुद्धा भक्ती आणि धर्मविषयकच असावी.

आपण लिहिले आहे की, अशी कुणीही व्यक्ती नाही की जी हे सांगू शकेल की, 'जीवनाची किंमत चुकवण्यासाठी तू जो मार्ग निवडला आहेस तो बरोबर आहे.' - असे कुणी नाही सांगितले तरी काय फरक पडतो ? ईश्वर अंतर्यामी आहे, सर्वज्ञ आहे. याउपर मी तर म्हणेन की कुणी आपल्याला असे सांगावे असे आपल्याला वाटायचे कारणच नाही. हा 'सकामभाव' आहे. मनात 'सकामभाव' येणे ठीक नाही. आपण करीत असलेल्या कामाची कुणी प्रशंसा केली तर त्या कामाचे मूल्य घटते. म्हणून अशी इच्छाच मनात ठेवू नये.

आपणास उपासनेखेरीज जीवन भारस्वरूप वाटते, ही चांगली गोष्ट आहे. आपले द्रव्योपार्जनासाठी दहा-बारा तास खर्च करणे काही चुकीचे नाही. परंतु याचाही साधनेसाठी उपयोग करा. आपले जीवनयापनार्थ कार्यही परमेश्वराच्या नावा-रूपाच्या आधारे, त्याचेच काम समजून, त्याच्या आज्ञेनुसार, ईशसेवाभावाने करीत राहावे.

भगवान श्रीकृष्ण म्हणतात -

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।**
**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ।।** (गीता १८.५६)
**करूनिही सदा कर्मे सगळी मज सेवुनी ।**
**पावे माझ्या कृपेने तो अवीट पद शाश्वत ।।** (गीताई १८.५६)

परमेश्वराचे अखंड चिंतन आणि निष्कामभाव या दोन गोष्टींचा अवलंब केला तर सगळी सांसारिक कर्मे देखील मुक्तीच्या मार्गाचे उच्च कोटीचे साधन बनू शकतात.

मानसोपासनेसंबंधी आपण पृच्छा करता की, 'रामराम जप करणारे मन कुठे आणि किती भरकटेल ? १०८ पैकी ५ वेळा तरी प्रेमासक्त राम ओठात येईलच.' अगदी बरोबर. न करण्यापेक्षा हे बरे.

मानसोपासनेबद्दल बोलायचे तर - मानसपूजा, जप, ध्यान म्हणजेच मानसोपासना. परंतु संध्या, गायत्री, पूजापाठ आदी तर क्रियारूपानेच केले पाहिजेत. मनाने करणे ठीक आहे, पण फक्त मनानेच करावे असे नाही. मानसोपासना कठीण असते म्हणून ती सर्वांना शक्य नाही. म्हणून ती अनिवार्य नाही. संध्या, गायत्री, पूजा आदी नित्यकर्मात मोडतात. ती क्रियारूपात करणे अनिवार्य आहे. ती तशी नाही केलीत तर प्रत्यवाय-दोष मानावा.

आपण लिहिले आहे की, 'केवळ मनाने अशी कल्पना केली की, मी तिथे जातो आहे, रस्त्यात मला नाना वस्तू दिसत आहेत. असे करण्याने मी तिथे पोहोचेन का ?' नाही पोहोचणार, पण ही गोष्ट ऐहिक विषयात सत्य आहे. ईश्वराच्या बाबतीत नाही. त्याच्या बाबतीत अशी कल्पना दृढ भावनेने केल्यास तसे होऊ शकते; कारण परमेश्वर चैतन्ययुक्त आणि सर्वज्ञ आहे.

आपण लिहिता की, 'मानसिक कामाने प्रत्यक्ष लाभ काही होत नाही.' बरोबर आहे. ऐहिक गोष्टी कल्पनेने मिळत नाहीत, पण मानसिक उपासनेने ईश्वरप्राप्ती होऊ शकते.

संध्योपासना मात्र क्रियारूपानेच केली पाहिजे; कारण ती अनिवार्य आहे. कधी सोयर-सुतक असेल तर मनाने केली तरी चालेल. आणि गायत्री जप तर शक्यतोवर नेहमीच मानसिक रूपात करावा. अर्थात् जप जर मानसिक रूपात शक्य नसेल तर वाणीनेच करावा.

आपण विचारता की, 'संध्या मानसिक रूपात होऊ शकते काय ?' होऊ शकते. संध्येचे मंत्र जीभ आणि ओठ बंद न करता मनातल्या मनात उच्चार करा किंवा मनानेच कागदावर लिहिलेले पहा आणि त्यानुसार आचमन-मार्जन इत्यादि क्रिया करीत राहा.

आपण म्हणता की, 'शरीर जे कार्य करील तिकडे मन आपोआपच जाईल' - बरोबर आहे. पण आम्ही मानसिक उपासनेबद्दल जे लिहिले आहे, ते अधिक श्रेयस्कर. एकांतात बसून केली जाणारी संध्या, गायत्री, पूजादी कर्मे तर शौच-स्नानोपरांत पवित्र होऊन विधिवत् नियमितपणे करावीच. हिंडत फिरत करू नयेत. त्याव्यतिरिक्त सामाजिक, नैतिक, व्यावहारिक अथवा व्यावसायिक कामाच्या धावपळीत जो समय व्यतीत होतो, तोही देवाच्या नामारूपाचे स्मरण करीतच कारणी लावावा. सगळी कामे निष्कामभावाने करावीत. अशा प्रकारची मानसिक उपासना, एकांतात बसून विधिवत् केलेल्या उपासनेसारखीच ठरते. ज्याप्रकारे मनुष्य शौच, स्नान, आहारविहारादी शारीरिक कर्मे करीत करीत सुद्धा मनाने सांसारिक संकल्प-विकल्प करीत राहातो, तसेच सांसारिक कामाच्या धावपळीत देखील देवाच्या नामा-रूपाचे स्मरण करीत राहावे. सवयीने असे करता येते. अशाने तो सर्व समयदेखील साधनेच्या रूपात परिणत होऊ शकतो.

आपण '**ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या**' हे उध्दरण देऊन 'संसाराच्या व्यापात गुंतागुंतीखेरीज काही नाही, जे काही आहे ते नश्वर आहे,' असे जे म्हटले आहे, ते बरोबर आहे. अद्वैतसिद्धांतानुसार ही धारणा बरोबर आहे.

मनाच्या अशा गोंधळात देखील, आपण भजन-ध्यानादीपासून विमुख होत नाही, असे लिहिले आहे. आपण याला ईश्वरी कृपा मानावे.

आपल्याला अशी माणसे नेहमीच भेटतात, जी ईश्वराचे अस्तित्व मानत नाहीत, आणि देव फक्त भीती निर्माण करण्यासाठी आहे,' असे म्हणतात. चालायचेच. असे आक्षेप करणाऱ्यांच्याशी कधी मैत्री करता कामा नये. चुकून अशा लोकांची संगत झालीच, तर त्यांच्याकडूनही शिकवण घ्यावी. त्यांच्या त्या धारणेविरुद्ध भाव मनात निर्माण व्हावेत आणि देव जणू आपली परीक्षाच घेत आहे, असे समजून आपल्या कर्तव्यात दृढ राहावे. नास्तिक आणि विपरीत धारणेचे लोक शंका निर्माण करून आपल्याला आणखी दृढ बनवितात. त्यांच्या बोलण्याने विचलित होता कामा नये. आपण लिहिले आहे की, 'मी त्यांच्या बोलण्याने विचलित होत नाही.' चांगले आहे; ही परमेश्वराचीच कृपा आहे.

## २०

**महोदय,**

सादर प्रणामपूर्वक हरिस्मरण. आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. माझे पत्रोत्तर वाचून आपणास आनंद झाला, हे आपले सौजन्य आहे.

रामायणात श्रीरामाने जागोजागी शंकराचे स्मरण केले आहे, हे सर्वथा सत्य आहे. 'श्रीरामाचे इष्ट दैवत शंकर आणि शंकराचे इष्ट दैवत राम' असे आपल्याला रामायणात ठायीठायी दिसून येते, यात शंका नाही.

प्रभू रामचंद्रांनी कैलास पर्वतावर जाऊन शंकराला पार्वतीबरोबर विवाह करावयास सांगितले आणि तसा वर त्यांच्याकडूनच मागून घेतला, हे अगदी बरोबर आहे; पण तेव्हा शंकराने काय म्हटले ते पहा -

**नाथ बचन पुनि मेटि न जाहीं।।**
**सिर धरि आयसु करिअ तुम्हारा।।**
**परम धरमु यह नाथ हमारा।।**
**अग्या सिर पर नाथ तुम्हारी।।**

यावर श्रीतुलसीदास म्हणतात -

**प्रभु तोषेउ सुनि संकर बचना । भक्ति बिबेक धर्म जुत रचना।।**

हा प्रसंग पाहून हेच सिद्ध होते की, लहान-मोठा असा फरक उपासक आपल्या इष्ट देवाच्या संदर्भात करू शकतो. वस्तुत: कुणी लहान नाही आणि कुणी मोठा नाही.

आपण विचारता की, विषपान करणारे योगिराज शिवशंकर, कौस्तुभमणी धारण करणाऱ्या लक्ष्मीपती विष्णूचे किंवा लक्ष्मीपती विष्णू, हालाहल-पान करणाऱ्या शिवाचे ध्यान कसे काय करतात ? याचे खरे उत्तर वर दिलेलेच आहे. आता थोडा गांभीर्याने विचार केला तर लक्षात येईल की, विषपानाची शक्ती आपल्याला प्रभू रामाच्या प्रभावानेच मिळाली, असे शंकर मानतात.

श्रीतुलसीदास म्हणतात -

**नाम प्रभाउ जान सिव नीको । कालकूट फल दीन्ह अमी को ।।**

आणखी सविस्तर लिहायची आवश्यकता नाही. कारण संत तुलसीदासांनी या प्रसंगाचे भरपूर स्पष्टीकरण दिले आहे. थोडा गंभीरपणे विचार केला, तर आपण हे समजू शकाल.

## २१

**सादर हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. आपल्या सर्व प्रश्नांची उत्तरे खालीलप्रमाणे-

'निर्बीज समाधी'मध्ये सर्व प्रकारच्या कर्म-संस्कारांचा सर्वथा निरोध होतो. याचे वर्णन योगदर्शनाच्या समाधिपादाच्या शेवटी आले आहे. यालाच असंप्रज्ञातयोग, धर्ममेघसमाधि, कैवल्यपद, द्रष्ट्याची स्वरूप-प्रतिष्ठा इत्यादी नावांनी योगदर्शनात संबोधले जाते.

सबीज समाधीचे मुख्य प्रकार दोन - (१) सविकल्प व (२) निर्विकल्प. सविकल्प समाधीचे वर्णन सवितर्क आणि सविचार या नावांनी पण केले गेले आहे. योगदर्शन समाधि-पादाच्या सूत्र ४१-४३ मध्ये याचे सविस्तर वर्णन आहे. याच प्रकरणात निर्वितर्क आणि निर्विचार या नावांनी निर्विकल्प समाधीचे वर्णन पण आहे.

उधार-उसनवारीचा व्यवहार नेहमी सज्जन लोकांच्याबरोबरच करावा आणि त्यातही कायदेशीर करारनामा सुरवातीसच करावा. म्हणजे भांडणे होत नाहीत. खोटा साक्षीदार उभा करणे, हे खोटेपणाचेच. त्याला योग्य कसे म्हणता येईल ? जेव्हा एखाद्या पूर्वी केलेल्या अपराधाची शिक्षा मिळणे बाकी असते, तेव्हाच खरा खटला रद्द होतो.

## २२

**सादर हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. आपण संत तुलसीदासांची ही चौपाई लिहिली आहे. -

**होइहि सोइ जो राम रचि राखा । को करि तर्क बढावै साखा ।।**

ही चौपाई नवीन कर्माच्या संदर्भात नाही. ही केवळ पूर्वकृत कर्मांची फळे भोगण्याच्या संदर्भात आहे. भावार्थ असा की, मनुष्य हा फळे भोगण्याच्या बाबतीत सर्वथा परतंत्र आहे. प्रारब्धानुसार जे ठरलेले आहे, ते सुखदु:ख त्याला भोगायला लागणार. पण नवीन कर्माच्या बाबतीत मनुष्य स्वतंत्र आहे. त्यासाठी परमेश्वराने माणसास सदसद्विवेकबुद्धी दिली आहे. म्हणून माणसाने जे काही करायचे, ते सारासार विचारपूर्वक करावे. चुकूनही पापकर्म करू नये. केलेच तर त्याला तो स्वत: जबाबदार आहे आणि त्याची शिक्षाही निश्चितपणे भोगायला लागेल; कारण प्रत्येक मनुष्यासाठी देवाने कर्तव्य निश्चित केले आहे आणि ते समजण्यासाठी विवेकशक्ती दिली आहे.

भगवान कृष्णांनी गीतेच्या दुसऱ्या अध्यायातील ४७ व्या श्लोकात स्पष्ट म्हटले आहे की, 'कर्म करणे तुझ्या हातात आहे पण फलावर तुझा अधिकार नाही.' इथे हे समजणे आवश्यक आहे की, संत तुलसीदासांनी हे फलभोगाच्या संदर्भात लिहिले आहे. नवीन कर्माच्या बाबतीत नाही.

## २३

**महोदय,**

सादर हरिस्मरण. आपले ३.६.५४ चे पत्र वेळेवर मिळाले होते. आपल्या शंकांचे समाधान खालीलप्रमाणे -

अत्याचार करणाऱ्यांना मारणे हे शास्त्रानुसार पाप नाही, ही गोष्ट अर्जुनालाही माहिती होती, पण त्याला समोर सगळेच्या सगळे आप्तेष्ट उभे दिसत होते. म्हणून मोहवश त्याला वाटले की, यांना मारणे पापाचे होईल. त्याने आपल्या या विचाराचा विस्तार कुलघाताच्या परिणामात केला आहे.

भगवंतांनी गीतेमध्ये 'आत्मा नित्य, जन्ममृत्युरहित आहे,' असे सांगितले आहे हे पूर्ण सत्य आहे. श्रुतीमध्ये आत्महत्या करणाऱ्यास नरकवासाची शिक्षा सांगितली आहे, तेही बरोबर आहे. कारण आत्मा

शब्दाचा एकच अर्थ नाही. गीतेत जे जन्म-मृत्युरहित आत्म्याचे वर्णन आहे, ते विशुद्ध सचेतन आत्मतत्त्वाचे वर्णन आहे आणि श्रुतीमध्ये 'आत्म' हा शब्द निज-वाचक आहे. जो मनुष्य आपले कर्तव्यपालन विसरून मनुष्य-जन्माचा व्यर्थ नाश करतो, तो स्वतःचे अधःपतन करतो. त्यालाच इथे आत्महत्या असे म्हटले आहे, म्हणून तो मनुष्य आत्म-हत्यारा. आत्महत्या हा शब्द आत्म्याच्या नाशाच्या संदर्भात असेल, तर असेही म्हणता येत नाही की, असा मनुष्य घोर अंधाराने व्याप्त लोकात जाईल. जर आत्म्याचाच नाश झाला, तर तो जाणार कसा ? अर्जुन श्रीकृष्णाचा जिवलग मित्र होता, ही गोष्ट श्रीकृष्णाने आणि अर्जुनानेही पुन:पुन: स्वीकार केली आहे, यात शंका नाही. परंतु कृष्णाचे ते विक्राळ स्वरूप पाहून अर्जुनास त्या मित्रत्वाचाही विसर पडला आणि तो भयभीत झाला. म्हणूनच तर भगवान कृष्ण म्हणतात की, ''तुझ्यावर प्रसन्न होऊन, हे अद्‌भुत रूप मी तुला दाखविले आहे; या दर्शनाने तू भयभीत किंवा व्यथित होऊ नकोस.''

गीतेच्या तिसऱ्या अध्यायात 'ज्ञान' आणि 'ज्ञानी' या शब्दांचा खूप ठिकाणी उपयोग केला गेला आहे. असे मानावयाचे कारण नाही की , त्या सर्व ठिकाणी त्यांचा एकाच विशिष्ट अर्थाने वापर झाला आहे. कुठे त्याचा अर्थ 'तत्त्वज्ञानी' म्हणून (३.३३) कुठे 'विवेकज्ञान' म्हणून (३.३९) तर कुठे 'ज्ञानयोग' (३.३) असा आहे. म्हणून आपण श्लोकाच्या संदर्भाने ज्ञानाच्या स्वरूपाबाबतची पृच्छा केल्यास बरे होईल.

जे ज्ञान कामाने वेष्टित असल्याचे म्हटले आहे, ते म्हणजे 'विवेक'. ज्या ज्ञानाने कामाचा वध करण्याबद्दल लिहिले आहे ते म्हणजे तत्त्वज्ञान. म्हणून ज्ञानाचे स्वरूप संदर्भानुसार समजून घेण्याचा प्रयत्न करावा.

जेव्हा संत तुलसीदास म्हणतात की, कर्माचे फळ भोगायलाच लागते, त्याचा संदर्भ सकाम कर्माशी जोडावा. निष्काम भावाने केलेल्या किंवा त्रयस्थपणे निरभिमान वृत्तीने केलेल्या कर्माचे फळ भोगायला लागायचे कारण नसावे. रामायणात देखील निष्काम कर्माचे महत्त्व

सांगितले आहे आणि जे कर्म कृष्णार्पण केले जाते, त्याचे फळ भोगायला लागत नाही.

## २४

**सादर हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. आपण सकाम पाठ, उपासना आणि स्वप्न इत्यादींबद्दल लिहिले आहे.

ज्या घटनेमुळे आपले मन पश्चात्तापाने पोळले आहे, ती घटना एक दुःस्वप्न होती असे समजणेच हितकर. त्या स्त्रीशी कोणत्याही प्रकारचा संबंध ठेवू नका आणि तिच्यावर क्रोधही करू नका. कारण यात तिचा काही अपराध नाही. तुमच्याच मनाचा तो विकार आहे. भगवद्भजन हेच त्याचे सर्वोत्तम प्रायश्चित्त.

हनुमान तर देवाचा अनन्य भक्त, परम दयाशील आणि संत आहे. कोणत्याही परिस्थितीत तो कुणाचे वाईट करणार नाही. तो आपल्या भक्तावर रागावत तर नाहीच, उलट नेहमी त्याचे भलेच करतो, म्हणून तो क्रोधित झाला असेल अशी शंकासुद्धा मनात आणू नका. तो क्षमेचा मूर्तिमंत पुतळा आहे. आपण क्षमेची याचना केलीत. आता त्याच्याकडून अभयदान मिळाले असे समजा आणि देवाच्या ध्यानी-भजनी लागा. यथाशक्ति हरिनामाचा जप करावा. त्यात लाभ आहे. जे होऊन गेले, त्याचे चिंतन करण्यात काही अर्थ नाही.

## २५

**सादर हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. गीता-तत्त्वविवेचनीच्या चौदाव्या अध्यायाच्या २४ व्या श्लोकाच्या अर्थात्, सत्वगुणाने संपृक्त होऊन मृत्यू पावणाऱ्यांना पुण्यलोक (अमल-लोक) प्राप्त होतो, असे म्हटले आहे. पुण्यलोक म्हणजे साधा स्वर्ग-देवलोक-नाही. म्हणून जो

अर्थ केला आहे तो ठीक आहे. गीतेमध्ये जिथे जिथे सात्विक कर्माचे वर्णन आहे, तिथे तिथे ही सात्विकता निष्कामभावात असल्याचेच सांगितले आहे. सकामभावाला 'राजस' म्हटले आहे. सतराव्या आणि अठराव्या अध्यायात सात्विक यज्ञ, सात्विक तप, सात्विक दान, सात्विक त्याग, सात्विक कर्म, सात्विक कर्ता इत्यादी आपल्याला प्रकर्षाने दिसून येतील. चौदाव्या अध्यायातदेखील ज्ञान आणि प्रकाश यांनाच सत्वगुणाची लक्षणे मानली आहेत. म्हणून गीतेच्या अनुसार जर निष्काम भावालाच सात्विक भाव मानले असेल तर, त्याचे फळ निष्काम कर्म करणाऱ्यांना प्राप्त होणार नाही, हे कसे शक्य आहे ?

मनुस्मृती आणि भागवतात ज्या सत्वगुणाचे वर्णन आहे त्यात निष्कामभावाला प्राधान्य नाही. म्हणून तर त्याच्या फलस्वरूप देवलोकाची प्राप्ती होते, असे म्हणणे ठीकच आहे. उपनिषदात निष्काम कर्माचे फल मुक्ती आहे, असे म्हटले आहे ते पण ठीक आहे; कारण ते वर्णन अंतरातल्या सगळ्या इच्छांच्या निवृत्तीनंतरचे आहे. गीतेच्या दुसऱ्या अध्यायातील ७१ व्या श्लोकातही हेच सांगितले आहे.

गीतेच्या तिसऱ्या अध्यायातील १९ व्या श्लोकात हाच पूर्ण निष्कामभाव वर्णन केला आहे. तत्त्वविवेचनीच्या अर्थाशी आपण सहमत व्हाल, अशी आशा आहे.

## २६

**सादर हरिस्मरण.**

आपले पत्र वेळेवर पोहोचले. मजकूर समजला. मी पत्रोत्तर लिहिणे बंद केले आहे,असा गैरसमज नसावा. आणि यात परोपकार कसला ? देवाने माणसाला जे जे दिले आहे, ते ते त्याच्याच कारणी लागले तर अहोभाग्यच म्हणायचे. तसा प्रयत्न करणे आपले कर्तव्यच आहे.

खरा संत ओळखणे मोठे कठीण आहे. देवाच्या कृपेनेच संतांची ओळख-भेट होते.

गीता-रामायणासारख्या सद्ग्रंथात प्रतिपादन केलेला साधनेचा एखादा मार्ग कुणाही सत्पुरुषाने आपणास सांगितला तरी त्याच्या पालनाने उन्नती नक्कीच होणार. पण त्या मार्गावर साधकाची नि:संदेह दृढनिष्ठा हवी, तो मार्ग त्याच्या आवाक्यातला हवा, त्याची त्याला गोडी वाटावी आणि त्याच्या दृष्टीने तो सहज अवलंबण्यासारखा सोपा मार्ग असावा.

तसे पाहिले तर माणसाजवळ ज्ञानाची कमतरता नाही. देवाच्या दयेने त्याला जी स्वाभाविक विवेकशक्ती लाभली आहे, ती जरी त्याने तारतम्याने वापरली, तरी ईशकृपेने आवश्यक मार्गाचे ज्ञान त्याला आपोआप होईल. पुढे आपल्याआपण हा मार्ग अधिक सुसाध्य होत जाईल. मग त्याला बाह्य गुरूची फारशी आवश्यकता भासणार नाही. आणि जरूर पडली तर प्रत्यक्ष परमेश्वर त्याची गुरूशी भेट घडवून देईल.

आजकालचा काळ फार वाईट आहे. गुरू पैशाला पासरी झाले आहेत. अशा कठीण परिस्थितीत गुरु-दीक्षेसाठी आग्रह न करता प्रत्यक्ष परमेश्वरालाच आपला गुरू मानणे अधिक श्रेयस्कर.

खरा अनुभवी योगी ओळखणे फार कठीण. साधक पुष्कळ मिळतील पण सगळ्यांची साधने वेगळी. म्हणून स्वत:च कुणा योग्य साधकाची सहयोगी म्हणून निवड करावी, हे अधिक चांगले.

गीतेवर संस्कृत भाषेत खूप भाष्ये मिळतील. पण हिंदीत कमीच. बरीचशी संस्कृत भाष्ये मी माझ्या बुद्धीनुसार आपल्या विचारात गुंफून गीतेवर तत्त्वविवेचनी नामक एक टीका हिंदी भाषेत लिहिली आहे. ही टीका गीता प्रेसने प्रकाशित केली आहे. वाटल्यास आपण ती पाहू शकता. ती वाचून आपला जर काही फायदा झाला तर मला आनंदच होईल. पातंजलयोगदर्शनावर देखील गीता प्रेसने हिंदीत व्याख्या प्रकाशित केली आहे, ती आपण पाहू शकता.

आपण आपल्या घरच्या परिस्थितीबद्दल लिहिताना, आपला स्वत:चा अध्यात्माकडे ओढा असल्याने, सांसारिक गोष्टींमध्ये आपल्याला रस नाही, असे लिहिले आहे. ही तर परमेश्वराची कृपा. घरकाम आणि

अभ्यासाच्या काळजीसंबंधी आपण माझा सल्ला मागितला आहे. माझ्या मते कॉलेज-शिक्षणाची तशी खास आवश्यकता नाही. भाषाज्ञान तर आपल्याआपण किंवा एखाद्या शिक्षकाच्या मदतीने घरातल्या घरात प्राप्त करू शकता. उपजीविकेसाठी कामाबद्दल बोलायचे तर, सगळ्यात सोपे म्हणजे त्याची चिंताच करू नका. किंबहुना घर आणि घरचे लोक यांना स्वत:चे न मानता ईश्वराचे माना आणि घरचे कामही त्याचेच काम आहे असे समजून त्याला प्रसन्न करण्याच्या हेतूने यथाशक्ति करावे. हीच आपली साधना मानावी. हे कामच साधना म्हणून करायला लागले की, त्या साधनेत विघ्नही येणार नाही आणि त्याचे ओझे पण वाटणार नाही.

आपण आजीवन ब्रह्मचारी राहून आईवडिलांच्या सेवेसाठी जीवन व्यतीत करायचे ठरविले आहे. चांगली गोष्ट आहे. ब्रह्मचर्य पालन हे आध्यात्मिक उन्नतीसाठी परमोपयोगी आहे, हे जरी खरे असले तरी ते फार कठीण आहे. कारण समजा, शरीरावर संयम ठेवला आणि मन चळले, वीर्यरक्षण नाही होऊ शकले, मनात भोगेच्छा आणि स्त्रीसुखाची तीव्र इच्छा तशीच राहिली तर त्यात नुकसानच आहे. त्यापेक्षा केवळ शारीरिक भोग-तृप्तीसाठी, धर्मानुकूल, महिन्यातून नियमितपणे एकदोन संयोग करून हळूहळू तीही भोगवासना संपुष्टात आणायचा प्रयत्न केल्यास अधिक लाभप्रद होईल.

आपण दोन वर्षांपासून साधनारत आहात. ईश्वराची कृपाच आहे ही. तत्पूर्वीचे आपले जीवन कसे जरी गेले असले तरी त्यावेळच्या दोषांची सारखी उजळणी करीत बसू नका. दोष जितका तितकेच त्याचे चिंतनही भयंकर. म्हणून आपल्या भूतकाळातील दोषांची उजळणी तर करू नये, दुसऱ्यांच्या दोषांचे चिंतनदेखील करू नये. दुसऱ्यांचे दोष शोधणे आणि त्यांना दोषी समजून त्यांचा तिरस्कार किंवा द्वेष करणे, तसेच स्वत:च्या सद्गुणांचा गर्व बाळगणे, हे सगळे भयंकर दोष आहेत.

साधनेचा मार्ग बदलण्यात प्रारब्धाचा काही हात नाही. जेव्हा साधनामार्ग साधकाची रुची, पात्रता आणि श्रद्धेच्या अनुरूप नसतो, तेव्हा तो नीरस व

भाररूप वाटू लागतो. मग तो बदलण्याची वारंवार इच्छा होऊ लागते. म्हणून जोपर्यंत साधनामार्ग निश्चित होत नाही तोपर्यंत आपली पात्रता व रुची यांचे सम्यक् ज्ञान प्राप्त करण्यासाठी साधनामार्गात बदल करायला हरकत नाही. परंतु एक गोष्ट लक्षात ठेवावी की, साधनेचे लक्ष्य सुरक्षित राहिले पाहिजे. अर्थात् देवावरचा विश्वास वाढत राहावा, ईशप्रेम वृद्धिंगत व्हावे, भोगवासना संपुष्टात यावी, जगातली कोणतीही वस्तू, परिस्थिती आणि व्यक्ती आपल्या सुखासाठी निर्माण झाली आहे असे वाटू नये आणि कोणतीही नश्वर वस्तू आधारभूत वाटू नये. हे लक्ष्य जर अटळ राहिले, तर साधनामार्गात बदल करायला हरकत नाही.

साधनामार्ग बदलण्याबद्दल किंवा न बदलण्याबद्दल देवासमोर प्रतिज्ञा करू नये. त्याच्यावर विश्वास ठेवून, 'तो जे काही करतो, ते माझ्या भल्यासाठीच' असे मानून सगळे त्याच्यावर सोडावे. 'मी पण कर्ता आहे', हा वृथाभिमान सोडावा. साधनेत जी काही प्रगती आहे, ती त्याच्या कृपायुक्त प्रेरणेने आहे, असे मानून कोणत्याही परिस्थितीत त्याची कृपा वारंवार आठवावी आणि त्याच्याशी कृतज्ञ राहून त्याच्या प्रेमात लीन व्हावे.

ईश्वरासमोर केलेली प्रतिज्ञा मोडलीच तर त्यासाठी त्याची मनापासून क्षमा मागणे, हेच उत्तम प्रायश्चित्त आहे. त्याच्यासमोर सरळ कबूल करावे की, 'हे परमेश्वरा, अहंकारवश मी तुझ्यासमोर प्रतिज्ञा केली होती. त्या अहंकाराचा नाश करण्यासाठीच तू अशी परिस्थिती निर्माण केलीस की मला ती प्रतिज्ञा मोडावी लागली. माझ्या या चुकीबद्दल मला क्षमा कर. पुन्हा कधी माझ्यात असा अहंकार निर्माण होऊ नये, यासाठी मला सद्बुद्धी दे.'

आपण आपल्या एका मित्राबद्दल विचारणा केलीत की, तो १४ वर्षांपासून साधना करतो आहे, परंतु फारशी प्रगती करू शकला नाही. या बाबतीत सगळे नीट समजल्याशिवाय मी काय लिहू ? साधनेच्या मार्गाची त्यांची निवड चुकीची असू शकेल किंवा लक्ष्य आणि साधनेचा मार्ग यांच्यावर पुरेशी श्रद्धा नसेल. आपल्याच लिहिण्यावरून असे वाटते की,

त्यांनी हट्टाने ब्रह्मचर्य पालन तर केले; पण त्यांच्याकडून मानसिक संयम होऊ शकत नाही. अन्यथा त्यांना स्वप्नदोष झाला नसता.

कष्ट-भोग कोणत्या जन्मातल्या पापाचे फळ आहे, हे ठरवणे कठीण आहे. कारण फळ देणे हे परमेश्वराच्या हातात आहे. साधकाने त्याची चिंता करू नये. त्याने तर प्रतिकूल परिस्थितीससुद्धा कृपासिक्त विधि-विधान समजावे.

## २७

**महोदय,**

सादर प्रणाम आणि हरिस्मरण. आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. आपण माझ्याशी मित्रवत् व्यवहार करू शकता आणि हरिस्मरण लिहू शकता.

'आत्मा' शब्द स्वभावत: निर्मलतेचा द्योतक असला तरी जेव्हा त्याला कर्ता किंवा ज्ञाता असे संबोधले जाते, तेव्हा त्याचा संदर्भ निर्मल स्वरूपाशी नसतो. म्हणून गीतेच्या अठराव्या अध्यायातील १६ व्या श्लोकात 'केवल' या शब्दाचा अर्थ निर्मल किंवा पावन असा करणे आवश्यक आहे. त्याला याच अर्थाने 'एकटा' असेही म्हटले जाते. या श्लोकात 'तत्र' हे पद न्याय आणि विपरीत कर्मांचे बोधक नसून त्या सबंध प्रकरणाचे बोधक आहे. 'एवं' पदही त्याच प्रकारचे बोधक आहे. प्रकारांतराने ते पाच हेतूंचे द्योतकही मानले जाऊ शकते. पण पुढे सात्विक, राजस व तामस असे कर्त्याचे जे प्रकार सांगितले आहेत, तो कर्ता कोण ? आणि पाच हेतूंमध्ये जो एक कर्ता सांगितला आहे तो कोण? 'त्या' पाचांमध्ये जो कर्ता आहे, तो सचेतन का अचेतन ? विचारांती असे लक्षात येऊ शकेल की, या ठिकाणी 'केवल' शब्दाचा अर्थ 'एकटा' असा न करता निर्मल किंवा पावन असाच करावा.

दैव शब्द नैमित्तिक कर्मासाठी वापरला नसावा; कारण दैवाची गणना पाच हेतूंमध्ये आहे आणि नैमित्तिक कर्म तर स्वत:च वर सांगितलेल्या पाच हेतूंमुळे होणारे कर्म आहे.

श्रोत्र आदी पाच ज्ञानेंद्रिये प्रत्येक कर्मामध्ये कारण आहेत. ज्ञानेंद्रियाशिवाय कर्मसंपादन होऊच शकत नाही. ऐकणे, पाहणे आदि ज्ञानेंद्रियांची कामेही कर्मातच मोडतात. विचारांती असे आढळून येईल की, हातापायांच्या क्रियेत तर डोळे, कान वगैरेंची आवश्यकता आहे पण डोळे, कान इत्यादींच्या कामात हातापायाची आवश्यकता नाही. म्हणूनच 'ज्ञान' हा शब्द त्या ठिकाणी ज्ञानेंद्रियवाचक नसावा, कारण इंद्रिये म्हणजेही करणच. करण हे प्रेरक असू शकत नाही. तिथे 'ज्ञान' शब्द कर्तव्याकर्तव्याच्या जाणीवेचा वाचक आहे. कर्तव्याकर्तव्य हे ज्ञेय आणि ते जाणणारा तो ज्ञाता. या तिहींच्या संयोगाने मनुष्याची कर्म करण्याची इच्छा होते. म्हणून त्यांना कर्मप्रेरक म्हटले आहे. कर्माचा संकल्प प्रथम मनात निर्माण होतो, इंद्रियांमध्ये नाही. उदाहरणार्थ, समजा, एखाद्या माणसाला तहान लागली तर त्याला, 'पाणी प्यायला हवे' असे वाटते. इथे पाणी पिणे हे कर्तव्य. हेच ध्येय. त्याची आवश्यकता लक्षात येणे हे ज्ञान, आणि ज्याच्या हे लक्षात येते तो ज्ञाता. त्यानंतर पाणी मिळवणे आणि ते पिण्यासाठी जी क्रिया केली जाते ते कर्म. ज्या कर्मेंद्रियांद्वारा आणि ज्ञानेंद्रियांद्वारा ही क्रिया केली जाते, त्यांना म्हणायचे करण. क्रिया करणारा कर्ता. पाणी प्यायला जाणे हे कर्मसंपादन. अशा प्रकारे प्रत्येक बाबतीत समजून घ्यावे.

योगशास्त्रात कोणत्याही पदार्थाच्या ज्ञानाच्या अनुभूतीची तीन प्रमाणे मानली गेली आहेत. (१) प्रत्यक्ष (२) अनुमान आणि (३) आगम. या तिन्हींचे नाव प्रमाण. प्रमाण नावाचा आणखी कुठलाही भाव नाही. उदाहरणाने होणाऱ्या प्रमाणास उपमान असे म्हणतात. याचा अंतर्भाव अनुमानातच होतो. म्हणून योगशास्त्रात तीनच प्रमाणे मानली गेली आहेत.

प्रत्यक्ष ज्ञान केवळ इंद्रियांद्वारे होत नाही. इंद्रिये ही मन आणि बुद्धी यांची फक्त सहायक आहेत. वाळवंटात डोळ्यांना पाणी दिसते, पण मिळत नाही. तेव्हा बुद्धीला डोळ्यांची चूक लक्षात येते. अर्थात् इंद्रिये स्वत: जाणत नाहीत. त्याचप्रकारे शास्त्रज्ञान आणि अनुमानज्ञान देखील मन, बुद्धी आणि इंद्रिये या तिहींच्या सहयोगानेच होते, केवळ इंद्रियांनी

नाही. थोडक्यात सांगायचे तर मन आणि बुद्धी यांच्याशिवाय कोणत्याही प्रकारचे ज्ञान होत नाही.

ज्या विषयांचे ज्ञान शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध यांहून वेगळे आहे, केवळ तेच फक्त नुसत्या मन-बुद्धीच्या साहाय्याने होऊ शकते. उदाहरणार्थ, 'संकल्प' हा फक्त मनाचा विषय आहे, त्यात इंद्रियांचा काही संबंध नाही. तसेच पाहाणे, ऐकणे, वास घेणे इत्यादी कामे कर्मेंद्रियांच्या मदतीशिवाय होऊ शकतात. म्हणून सगळी दहाच्यादहा इंद्रिये कार्यसंपादनाचे 'करण' असतात. त्यात कोणतेही इंद्रिय कर्मप्रेरक नाही.

## २८

**प्रेमपूर्वक हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. ईशदर्शनासाठी अश्रू ढाळत राहून देखील आपणास साक्षात्कार झाला नाही, याचे कारण मी कसे सांगणार ? कदाचित् आपण आपले मन निर्मळ करू शकला नसाल. अजूनही ते ऐहिक इच्छा-आकांक्षांनी भरले असेल. जर असे नसते आणि साक्षात्कार हीच एकमेव आकांक्षा शिल्लक राहिली असती, तर ईश्वरानेदेखील विलंब केला नसता. परमेश्वराची भेट हीच एकमेव आणि अनिवार्य आकांक्षा बाळगणे एवढेच काय ते साधकाने करायचे. जोपर्यंत देवाची भेट होत नाही, तोपर्यंत बेचैन होऊन त्या जिवलग, करुणासागर परमेश्वराच्या कृपेवर दृढ निष्ठेने असा ठाम विश्वास ठेवावा की, ' तो आपल्या निर्व्याज दयेने मला निश्चित दर्शन देईल.'

आपण लिहिले आहे की, एक संत आपणास म्हणाले की, 'हजारो वर्षे अश्रू ढाळत बसलास तरीही काही होणार नाही.' आता हे उद्‌गार त्या संताने कोणत्या संदर्भात आणि कशा भावनेने काढले, हे तोच जाणे. पण आपण ही गोष्ट मनावर घेऊन निराश होऊ नका. साक्षात्कार होणे न होणे हे देवाच्या हातात आहे, साधकाचे काम फक्त आशावादी राहून त्याला आळवीत राहणे. हे आळवणे दिवसेंदिवस वाढत गेले पाहिजे. जर मेघांतून

जलधारा पडल्या नाहीत, पाण्याच्या ढगांनी दगडांचा वर्षाव करून तृषातुर चातकांचे डोळे फोडले, म्हणून चातक कधी आपला तृषार्त टाहो बंद करील काय ? अशा विपरीत स्थितीतदेखील तो निराश होणार नाही.

संसार स्वप्नवत् दिसणे तर चांगले लक्षण आहे.

दुकानाचे काम आपले स्वत:चे न समजता त्या जिवलग परमेश्वराचे आहे, असे समजून त्याला प्रसन्न करण्याच्या हेतूने नीटनेटकेपणाने करावे, आणि हा भाव मनात ठेवावा की, जसा एखाद्या नाटक कंपनीचा मालक कलाकाराच्या उत्तम अभिनयानंतर प्रसन्न होतो, तसाच देव माझ्या सचोटीपूर्ण कामाने माझ्यावर प्रसन्न होईल.

रात्री स्वप्नात कधीकधी आराध्य देव दर्शन देतो, ही अत्यंत आशावर्धक गोष्ट आहे. स्त्रीभोगाची इच्छा होणे या गोष्टीचे द्योतक आहे की, देवाखेरीज इतर विषयांची आसक्ती अजून हृदयात बाकी आहे. विलंबाचे कारणही हेच आहे.

जे कोणी सत्पुरुष साकार भक्तीचे खंडन करतात, ते साकार भक्तीचे रहस्य जाणत नाहीत. म्हणून त्यांची हात जोडून क्षमा मागावी. 'माझा प्रिय परमेश्वर अणूरेणूत सर्वत्र भरून राहिला आहे', हा आपला भाव अगदी बरोबर आहे. आता तो जर सगळीकडे आहे, तर मूर्तीत पण आहेच ना ? निश्चितच आहे. इष्ट देव निर्गुण पण आहे आणि सगुण पण. तो साकार आहे आणि निराकार पण, हेच खरे.

ईश्वराचा साक्षात्कार फक्त त्याच्या कृपेनेच होतो. प्रारब्धाचा त्यात काही संबंध नाही. जितके वैराग्य अधिक तितके चांगले.

स्वत:ला ईश्वराच्या चरणी सोपवणे, त्याच्यावर पूर्ण अवलंबून राहणे हाच उच्च कोटीचा साधनामार्ग. गुरूपदेशाचा आग्रह धरणाऱ्या संतासमोर हात जोडून विनंती करावी की, 'मी तर ईश्वरालाच गुरू मानले आहे. जो सर्वांचा गुरू, तोच माझा गुरू.' ही गोष्ट मनात ठामपणे रुजवावी की, आता अन्य गुरूची आवश्यकताच नाही. आजकाल गुरू फार झाले आहेत. त्यांच्यापासून दूर राहणेच चांगले; कारण सद्गुरू मिळणे महाकठीण.

आपल्या साधनामार्गावर दृढ विश्वास ठेवावा. मनातून विपरीत

भावनांचे पूर्ण उच्चाटण करावे. स्वत:ला देवावर सोपवून दिल्यावर भीती कसली ?

प्रेम कधी पूर्णत्वास जात नाही. ते तर नेहमीच नवीन असते. प्रेमाचे स्वरूप अनंत आहे, म्हणून स्वत:चे प्रेम पूर्ण आहे, असा समज करून घेऊन वृथा अहंकार बाळगू नये की, साधनेच्या बळावर देव मला भेटेलच. तो त्याच्या स्वत:च्याच कृपेने पावतो. भेटल्याशिवाय त्याला चैन पडत नाही.

उणीव निदर्शनास आणून देणारा आणि ती उणीव दूर करणाराही तोच. त्याची शिकवण द्यायची पद्धत नेहमी वेगळी. ज्याने स्वत:ला सर्वस्वी त्याला अर्पण केले, ज्याने संसाराकडे पाठ फिरवून एकमात्र त्याचीच कास धरली, जो त्याचाच आश्रित झाला, त्याचे जीवन व्यर्थ कसे बरे जाईल ? ज्या दिवशी त्या परमसखा परमेश्वरावरच्या निश्चल विश्वासाने हा जीव त्याला वाहिला, त्याच दिवशी जीवनाचे सार्थक झाले. देवाधीन भक्ताजवळ यावयास कामक्रोध आदी षड्रिपूदेखील घाबरतात. जो देवाचा झाला, त्याच्यात दुर्गुण राहतीलच कसे ? आणि म्हणून दुर्गुणांच्या पायदळी जाण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

आपल्या पत्नीला 'आई' म्हणायची किंवा तिच्याकडे मातृभावाने पाहण्याची आवश्यकता नाही. तिला आपली जीवनसाथी समजावे आणि धर्मानुकूल ब्रह्मचर्यपालनपूर्वक तिचे आणि आपले कर्तव्य करीत राहावे. जे जे कर्म करायचे ते परमेश्वराला प्रसन्न करण्यासाठी, त्याच्याच प्रेरणेच्या अनुसार करावे.

सर्वांठायी परमेश्वर आणि परमेश्वराठायी सर्व या भावनेने समभाव ठेवून सर्वांशी प्रेमाने वागणे, यासारखी श्रेष्ठ गोष्ट नाही.

## २९

**महोदय,**

सादर हरिस्मरण. आपण विचारले आहे की, 'त्या जिवलग परमेश्वराला कोणत्या प्रकारे शरण जावे ?' खरे तर आपण सगळे जण जाणतो की, मनुष्य जेव्हा एखादे भयंकर दु:ख कोसळल्यामुळे हतबल होतो, तेव्हा तो

कुणातरी समर्थाच्या शरणागतीस जातो. हा सर्वविदित अनुभव आहे. म्हणून या क्षणभंगुर ऐहिक भोगांना दु:खाचे मूळ मानून आणि आपली जन्मोजन्मीची पापे व सांप्रतचे भयंकर जीवन समोर आणून, साधकाने दु:खदग्ध होऊन स्वत:ला हतबल, निराश मानून त्या परमेश्वराच्या चरणी स्वत:ला अर्पण करावे. कारण तोच एक निर्बळांचे बळ, निष्काम कृपाळू, परमसखा आणि सर्वसमर्थ आहे. सर्वार्थाने त्याच्यावर अवलंबून राहाणे म्हणजेच त्याला शरण जाणे. शरण जाण्यासाठी कुठला गुण किंवा शक्ती हवी असे नाही. उलट शक्तीचा अहंकार ही शरणागतीच्या मार्गातली अडचण आहे. जो स्वत:ला जितका निर्बल, असमर्थ आणि तुच्छ मानतो, तितकाच तो शरण जाण्यास योग्य.

## ३०

**महोदय, सादर हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. आपण लिहिले आहे की, 'या जगात मी एकटा राहिलो आहे', याचा अर्थ असा असावा की, आपली बायको-मुले वगैरे हयात नाहीत. खरे पाहिले तर या जगात कुणीतरी एकटा आहे का ?

अशा परिस्थितीत काय करावे, अशी आपण विचारणा केली आहे. मी माझ्या बुद्धीनुसार याचे उत्तर लिहीत आहे. आपणास योग्य वाटल्यास त्यानुसार करू शकता.

(१) आपण असे मानावे की, परमेश्वराने मला या संसाराच्या मोहातून मुक्त करून स्वत:कडे आकर्षित करण्यासाठीच आपल्या विशेष कृपादृष्टीने ही परिस्थिती निर्माण केली आहे. परिवारात राहून मुलाबाळांना आपले न मानणे आणि त्यांच्यावरचे प्रेम एकदम समाप्त करून देवाशी नाते जोडणे महा कठीण कर्म झाले असते. म्हणून आता देवाशिवाय अन्य कुणीच माझे नाही, फक्त देवच माझा आप्त-मित्र आहे, असे समजा.

(२) यापुढे संसाराच्या मायाजालात गुंतायचे नाही, असा आपण निश्चय केला आहे. चांगली गोष्ट आहे. आता जे काही करायचे ते देवाची सेवा

मानून त्याच्या प्रसन्नतेसाठीच करायचे. आता कुठल्याही अन्य वस्तूला, व्यक्तीला परिस्थितीला आणि अवस्थेला आपल्या सुखदु:खाचे कारण मानण्याचे प्रयोजन नाही. असे मानायचे की, 'जे जे काही घडते आहे ते आपोआप परमेश्वराच्या इच्छेने होत आहे आणि त्यात माझे परमकल्याण निहित आहे. परमेश्वराने जी इंद्रिये, मन-बुद्धी आणि जीवनोपयोगी वस्तू वगैरे मला दिले आहे, ते सगळे त्याचे आहे. या सगळ्याचा उपयोग त्याच्याच प्रेरणेने त्याच्या सेवार्थच करायचा आहे. जे शरीर इतके दिवस मी स्वत:चे समजत आलो, तेही त्याच्याच मालकीचे आहे. अर्थात् त्या शरीराचे पालनपोषण हाही त्याच्या सेवेचाच भाग. मला स्वसुखासाठी काहीही नको. आता तो परमेश्वरच माझा आणि त्याच्या प्रेमातच माझे परमसुख, तेच माझे जीवन.' अशा भावनेने संसाराकडे पाठ फिरवून केवळ देवावर अश्रित होणे, प्रत्येक परिस्थितीत त्याच्या निरागस कृपेचा अनुभव घेत प्रेमविभोर राहून त्याने दिलेल्या वस्तूंचा, त्याच्या प्रेरणेने त्याच्याच कामी उपयोग करीत राहाणे आणि त्याच्या मोबदल्यात कुठल्याही सुखाची इच्छा न करता निरहंकारी राहाणे हा मार्ग खरोखरीच श्रेयस्कर आहे.

आपण लिहिता की, 'कामक्रोधादी षड्रिपूंचा नाश अजून झाला नाही'. जो देवाला शरण गेला आणि निरिच्छ झाला अशा साधकासमोर षड्रिपु हतबल होतात. जोपर्यंत मनुष्य आपल्या आकांक्षांच्या पूर्तीची दुसऱ्याकडून अपेक्षा करतो, तोपर्यंत राग-द्वेष शिरजोर असतात; पण जेव्हा साधक दुसऱ्याच्या अधिकारांची धर्मानुसार पूर्ती करणे, हेच आपले ध्येय मानतो, पूर्णत: निरपेक्ष आणि निष्काम होतो, तेव्हा अहंकार आणि ममत्व हे दोन्ही संपुष्टात आल्यामुळे रागद्वेषादी षड्रिपूंचा आपोआप नाश होतो.

आपण विचारता की, 'मनुष्य-जीवनाचे लक्ष्य काय आहे ?' याचे उत्तर असे की, परमेश्वर प्राप्ती हेच मनुष्यजीवनाचे लक्ष्य. शास्त्रानुसार कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग हे त्याच्या प्राप्तीचे मार्ग. ज्याला जो अनुकूल वाटतो तो त्याने आचरावा. त्याच्यासाठी तोच सोपा. बव्हंशी, भक्तिप्रधान कर्मयोग अधिकतर लोकांना सोपा वाटतो. वर त्याचे स्पष्टीकरण दिलेच आहे.

आपण विचारले आहे की, 'जीवनक्रम कसा असावा? जीवनात व्यवहाराचे महत्त्व किती आणि संसाराची उपेक्षा किती प्रमाणात केली तरी चालेल ?' याचे उत्तर असे की, धर्मानुसार दुसऱ्यांना सुखी करण्यासाठी म्हणजेच ईशकृपेने आपल्याला मिळालेल्या शक्तीचा सदुपयोग करण्यासाठी, व्यवहारात कौशल्य आणि तत्परता असायला हवी. त्याबरोबरच स्वत:च्या सुखाची उपेक्षा पण करणे आवश्यक.

जीवनाचे बरोबर आकलन करण्यासाठी सर्वात सोपा उपाय म्हणजे आपल्या जीवनक्रमाचे निरीक्षण करीत राहा. आपले दोष शोधा आणि त्यांची पुनरावृत्ती होणार नाही असा निश्चय करा. सद्‌गुणांचा अहंकार बाळगू नका आणि दुसऱ्यांच्या दोषांकडे दुर्लक्ष करा, हाच एकमेव उपाय.

कोणत्या ग्रंथांचे अध्ययन करावे, असे आपण विचारले आहे. गीता-रामायण आणि अन्य आध्यात्मिक पुस्तकांचे वाचन करावे आणि त्यातले जे काही चांगले वाटेल ते आचरणात आणण्याचा प्रयत्न करावा. असे केल्यास त्या पुस्तकांच्या अभ्यासाचा फायदा होऊ शकेल. परंतु यापूर्वी सांगितलेल्या साधनामार्गाचा अवलंबदेखील केला पाहिजे. आपली जीवननौका संसारप्रवाहपतित होऊ देणे केव्हाही अयोग्यच. हां, ती देवाच्या भरवशावर सोडू शकता. त्याच्यावर आश्रित असणारा मनुष्य कधीही तोंडघशी पडत नाही.

'जीवन-निर्वाहासाठी काय करावे, असा आपला प्रश्न आहे. त्याचे थोडक्यात उत्तर असे की, ज्या कार्यात देश, समाज आणि शेजारी-पाजारी यांचे हित आहे, आपल्या ज्या कामामुळे बाकी सर्वांना त्यांच्या हिताच्या कामात मदत होईल असे कोणतेही काम, जे काम आपणास तनाने आणि मनाने शक्य आहे, ते पूर्ण धैर्य आणि उत्साहाने, निष्कामभावे ईश्वराची सेवा समजून करावे आणि त्याच्या प्रसन्नतेसाठी करावे. ज्या शरीराच्या बळावर ही सेवा केली जाते, त्याच्या निर्वाहासाठी धर्मानुकूल जे काही प्राप्त होईल त्याचा विनियोग शरीरपालनासाठी करावा. हेही देवाचेच

काम, कारण शरीरावर मालकी त्याचीच. शरीराच्या पालनपोषणात उपभोगाचा भाव असू नये.

हताश न होता हे जीवन भगवत्परायण बनवावे. असे करायचे माणसाला नेहमीच स्वातंत्र्य आहे, कारण ते परमेश्वराच्या इच्छेनुरूपच आहे.

(३१)

**प्रिय महोदय,**

सप्रेम हरिस्मरण. आपले पत्र मिळाले. आपण विचारलेल्या प्रश्नांची थोडक्यात उत्तरे याप्रमाणे.

यज्ञोपवीत शब्द 'यज्ञ' आणि 'उपवीत' या दोन शब्दांनी मिळून बनला आहे. यज्ञोपवीत संस्कारानंतर वैदिक यज्ञ करण्याचा अधिकार प्राप्त होतो. यज्ञोपवीत या गोष्टीचे सूचक आहे की, हा (धारक) द्विज आहे आणि याला वेदाध्ययन व वैदिक कर्मांचा अधिकार आहे. द्विज पुरुष वैदिक कर्मांचा अधिकार प्राप्त व्हावा, म्हणून उपनयन संस्कार करून यज्ञोपवीत धारण करतो. म्हणूनच यज्ञोपवीताचे एक नाव ब्रह्मसूत्र असेही आहे. ब्रह्मसूत्र हे वेदांच्या अधिकाराचे सूचक आहे.

यज्ञोपवीत वेदाधिकाराचे सूचक आहे. वेदाचा मुख्य मंत्र आहे वेदमाता गायत्री. हा २४ अक्षरी मंत्र आहे. गायत्री मंत्र चारी वेदांमध्ये आहे. चारी वेदातल्या गायत्रीच्या एकूण अक्षरांची बेरीज झाली ९६. म्हणूनच यज्ञोपवीताची लांबी ९६ अंगुळे निर्धारित केली गेली आहे. सामवेदाच्या छान्दोग्य परिशिष्टानुसार २५ तत्त्वे, ३ गुण, १५ तिथी, ७ वार, २७ नक्षत्रे, ४ वेद, ३ काल आणि १२ महिने यांची बेरीज ९६, म्हणून यज्ञोपवीतासाठी ९६ अंगुळे हे परिमाण मानून ते भुवनात्मक प्रतीक मानले गेले आहे. उपनयनानंतर यज्ञोपवीत धारण करणाऱ्यास ९६ हजार वैदिक ऋचांचा अधिकार प्राप्त आहे, हाही यज्ञोपवीताची लांबी ९६ अंगुळे असण्यातला मुख्य हेतू आहे.

त्रिगुणित केलेल्या ३ सूत्रांनी यज्ञोपवीत बनते. या त्रिगुण-निर्मित जगात, वैदिक (त्रयीच्या) आधाराने देव-ऋण, ऋषि-ऋण आणि पितृ-

ऋण या ऋणत्रयीपासून मुक्त होणे हे आपले कर्तव्य आहे, असे हे त्रिगुणित त्रिसूत्र आपल्याला सांगते.

अशा या अर्थपूर्ण विधीने तयार झालेल्या यज्ञोपवीताच्या ९ तंतूमध्ये ॐकार, अग्नी, अनंत, चंद्र, पितृगण, प्रजा, वायू, सूर्य व सर्व देव यांचा निवास आहे. म्हणून या देवतांचे गुण यज्ञोपवीताच्या ठायी आहेत.

यज्ञोपवीतास कधीही ४ गाठी नसतात. प्रवरसंख्येच्या अनुसार त्याला १, २, ३ किंवा ५ गाठी असल्या पाहिजेत. प्रत्येक गाठ एका प्रवराची द्योतक आहे. या गाठींच्या खाली ब्रह्मगाठ असते. ब्रह्मगाठीचे तात्पर्य असे की, वेदाधिकार प्राप्त करणेही त्या सर्वव्यापी परब्रह्माच्या प्राप्तीसारखेच आहे.

(अनुवादकाचे निवेदन - प्रवराच्या तीन आणि ब्रह्मगाठ एक अशा एकूण चार गाठीच मानल्या आहेत.)

यज्ञोपवीताच्या गाठींच्या संख्येबद्दल मला काही शंका होत्या. त्या मी गीताप्रेसला पत्राने विचारल्या. सामान्यपणे बाजारात जी जानवी मिळतात त्यात ३ गाठी असतात. प्रवरांच्या संख्येनुसार तीन प्रवर असलेल्या द्विजाच्या जानव्याला प्रवराच्या ३ + १ ब्रह्मगाठ अशा ४ गाठी हव्यात. परंतु उक्त परिच्छेदाने पहिले वाक्य याला विरोध दाखविते. मला मिळालेल्या गीताप्रेसच्या उत्तरानुसार यज्ञोपवीतास ३ गाठी असाव्यात.)

शास्त्रकारांनी उजव्या कानात आदित्य, वसु, रुद्र, वायु आणि अग्नी आदी देवतांचा वास मानला आहे.

**आदित्या वसवो रुद्रा वायुरग्निश्च धर्मराट्।**
**विप्रस्य दक्षिणे कर्णे नित्यं तिष्ठन्ति देवताः॥**

म्हणूनच शौचादिसमयी, आपण अपवित्र स्थितीत असतो तेव्हा, वेदाधिकाराचे प्रतीक यज्ञोपवीत उजव्या कानावर चढवले जाते. त्यावेळी त्याचे पावित्र्य रक्षण त्या कानात निवास करणाऱ्या देवता करतात, हीच त्यातली भावना. मनुष्याचे हृदय डाव्या बाजूस आहे. डाव्या खांद्यावरून उतरून हृदयावर रुळत राहणारे यज्ञोपवीत जणू हे सुचविते की, आपण

यज्ञोपवीत धारणाचा उद्देश हृदयात बिंबविला आहे. यज्ञोपवीत हे वेदांचे पवित्र प्रतीक आहे. म्हणून अपवित्र स्थितीत दक्षिण कर्णारूढ करून त्याचे पावित्र्यरक्षण कर्णस्थित देवतांच्या सहाय्याने केले गेले नाही तर ते अपवित्र होते. म्हणून ते बदलावे लागते.

यज्ञोपवीत धारण करून संध्या, गायत्री-जप न करणेही अनुचित आहे. परंतु जो यज्ञोपवीत धारणच करीत नाही, त्याला वैदिक कर्मांचा अधिकारच नाही. जर तो ती कर्मे करीत असेल तर त्याच्या माथी अनधिकार कार्याचा दोष येतो. म्हणून द्विजांनी यज्ञोपवीत धारण करूनच वैदिक कर्मे करावीत.

सद्गुणसंग्रह आणि दुर्गुणत्याग सर्वांसाठीच इष्ट आहे. मग ते द्विज असोत अथवा नसोत.

हा लोक म्हणजे मनुष्यलोक. परलोक म्हणजे मरणोत्तर प्राप्त होणारे अन्य लोक. 'लोक' याचा अर्थ मर्त्यलोक किंवा पृथ्वीलोक आणि 'तीन लोक' याचा अर्थ पृथ्वी, अंतरिक्ष आणि स्वर्ग असा समजावा.

आपण तामसी पदार्थांचा त्याग केला आहे, ही उत्तम गोष्ट आहे. शक्य तेवढा राजसी पदार्थांचा देखील त्याग करा. वीर्यरक्षण आणि अन्य रोगांबाबत एखाद्या योग्य चिकित्सकाच्या सल्ल्यानेच इलाज करावा. तो सल्ला द्यायला मी असमर्थ आहे. प्रत्येक रोग हा बहुधा प्रारब्धाचा परिणाम आहे. शरीराची सामान्यपणे कोणतीही स्थिती परमार्थ साधनेत विशेष बाधक होत नाही. आपण आपल्या शरीराच्या मोहामुळे केवळ शारीरिक स्थिती अनुकूल असतानाच भजन करतो आणि विषम स्थिती बाधक समजतो. भजनाचा संबंध मनाशी आहे आणि नेटाने अभ्यास केला तर शरीराच्या कशाही दशेत तटस्थ राहून देवाठायी मन रमवणे शक्य आहे. 'शरीर असेच (निरोगी, हट्टेकट्टे) राहिले पाहिजे,' हा हट्टच मुळी भजनातली अडचण आहे.

जसे प्रारब्ध असेल तसेच तर शरीर राहणार. मन देवाठायी जडवले पाहिजे.

## ३२

**महोदय,**

**सविनय प्रणाम.**

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. आपल्या प्रश्नांची उत्तरे खालीलप्रमाणे.

(१) 'निरंतर ईशसेवेत राहून आपल्या अल्प बुद्धीनुसार, गीता-रामायणादी धार्मिक ग्रंथांवर प्रवचने करीत, मी मानवसमाजाची सेवा करीत राहावे', - ही आपली सद्भावना आहे. वस्तुत: केवळ मनुष्यमात्राची नव्हे तर संपूर्ण प्राणिमात्राची सेवा म्हणजेच ईशसेवा. कारण सर्वांठायी परमेश्वर आहे. आपापल्या कर्मांच्या द्वारे जनताजनार्दनाची पूजा करणे प्रत्येक मनुष्याचे कर्तव्य आहे. पण या सेवेत फार मोठी सावधगिरी बाळगायला लागते. दुसऱ्यांना शिकवण देता देता माणूस जर असे समजायला लागला की, 'मी उपदेशक आहे, पूजनीय आहे, सन्मानास पात्र आहे, सदाचारी आहे, भगवद्भक्त आणि ज्ञानी आहे, ऐकणारे सगळे मूर्ख आणि दुराचारी आहेत व त्यांना सुधारणे माझे काम आहे वगैरे...', तर हा अहंकार भयंकर घातक. यामुळे उपदेशकात दंभ संचारतो, साधनेत दिखाऊपणा येतो, मोठेपणाची लालसा वाढते. याचा परिणाम असा होतो की, तो देवाच्या सेवेऐवजी आणि प्रचाराऐवजी आपलीच सेवा आणि आपलाच प्रचार करून घ्यायला लागतो. त्याच्याकडून मग लोकसेवा आणि लोकोत्थान होत नाही.

(२) आपण लिहिता की, 'उपर्युक्त कार्यात मला पैसा अडका किंवा मानसन्मान वगैरे कशाची अपेक्षा नाही.' फार चांगली गोष्ट आहे. तरी पण सावध राहिले पाहिजे. माणसामध्ये मानसन्मानाची तहान बहुधा सुप्तावस्थेत असते.

(३) 'दीनबंधू, पतितपावन आणि अधमोध्दारक' हीही देवाचीच नावे. तो प्राणिमात्रांचा सखा आहे. म्हणून तो कसल्याही पापी, दुराचारी माणसालासुद्धा भेटू शकतो. म्हणून त्याच्या भेटीच्या मार्गात निराश होऊ नये. देव इतका दयाळू आहे की, कुणाच्या पूर्वकृत कर्मांची यत्किंचितही

पर्वा न करता तो त्याची फक्त आजची दशा बघतो. जर आज कुणी आपल्या पापांचा पश्चात्ताप करीत असेल, भविष्यात जाणूनबुजून पाप करणार नसेल, आणि संपूर्णतः निष्काम, निरिच्छ होऊन फक्त देवाची आस लावून दृढ विश्वास ठेवीत असेल की, 'तो परमदयाळू, परमसखा परमेश्वर आपल्या सहज कृपेने प्रेरित होऊन मला नक्कीच भेटेल आणि माझ्यावर प्रेमाचा वर्षाव करील, तर माझी खात्री आहे की, त्याला देव निश्चितच भेटेल आणि लवकर भेटेल; कारण तसे भगवंताचेच वचन आहे. (गीता ९.३०,३१)

(४) आपल्या मनात काही जाणून घ्यायची इच्छा आहे. पण काय, आणि कशासाठी हे माहीत नाही. अशावेळी ती इच्छा पूर्ण तरी करील किंवा नाहीशी करील. जगाची आस सोडणे फार उत्तम, पण देवाची कास कधी सोडू नये.

(५) आपण जन्म-मरणाच्या प्रपंचात पडू इच्छित नाही, ही फार चांगली गोष्ट आहे. हा मायासागर पार करायचा एकच सोपा उपाय भगवंतांनी गीतेच्या सातव्या अध्यायातील १४ व्या श्लोकात सांगितला आहे, तो म्हणजे 'शरणागती'.

## ३३

**प्रिय महोदय,**

सप्रेम हरिस्मरण. आपले पत्र मिळाले. आम्ही काही तसे वेद-पंडित नाही, तरी पण आपल्या शंकासमाधानासाठी म्हणून काही लिहीत आहे. आमच्या समजुतीप्रमाणे वेदात मूर्तिपूजा आहे.

**कासीत् प्रमा प्रतिमा किं निदानमाज्यं किमासीत्** । (ऋग्वेद ८/७/१८/३)

इथे फक्त एकच मंत्र दिला आहे. या मंत्रात स्पष्ट पृच्छा केली आहे. यथार्थ ज्ञान काय आहे ? प्रतिमा काय आहे ? समस्त जगाचे प्रयोजन काय आहे ? घृततुल्य सार वस्तू काय आहे ?

यजुर्वेद अ. २ मं. २४ मध्ये अष्टविध मूर्ति-निर्माणाचे वर्णन दिले आहे. याखेरीज यजुर्वेद अ. ३१ मं. २२, ऋग्वेद ८/१/३/१, ऋग्वेद १/२/६/३ आणि यजुर्वेद १८/१५/३१/१६, अथर्ववेद २/५, २/३, ५/१, १०/२३, १६/१, सामवेद १/९/८ इत्यादी पुष्कळ असे मंत्र वेदात आहेत, जे 'प्रतिमेच्या' संबंधात आहेत. या संदर्भात आपण काशीहून प्रकाशित होणारा धर्म-विज्ञान नावाचा ग्रंथ जरूर वाचा.

इथे आणखी एक गोष्ट ध्यानात ठेवावी की, वेद हे सामान्य ग्रंथ नाहीत. ती ईश्वरी वाणी आहे. त्यातली भाषा समाधि-भाषा आहे. सामान्य व्याकरणाच्या चौकटीत त्यांचा अर्थ बसत नाही. निरुक्त (वैदिक शब्दांची यास्कमुनिद्वारा व्याख्या) देखील या कामी अपुरेच पडते. म्हणून वेदांचा अर्थ लावण्याबाबत असा आदेश आहे की,

**'इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत्।'**

आर्यसमाजाचे प्रवर्तक स्वामी श्रीदयानंद सरस्वतींनी पण हे कबूल केले होते की, वेदात समस्त ज्ञान आहे; पण आज एकही असे भाष्य उपलब्ध नाही, ज्यायोगे ते समस्त ज्ञान कुणी प्राप्त करू शकेल. वेदात काय काय ज्ञान भरले आहे याचे पूर्ण ज्ञान कोणालाच नाही. म्हणून जेव्हा कुणी असे म्हणतो की, 'अमुक गोष्ट वेदात नाही', तेव्हा तो त्याचा केवळ दुराग्रह असतो. वेदमंत्रांचा बरोबर अर्थ फक्त मंत्र-देवतेच्या आराधनेत एकाग्र झालेल्या चित्तातच उदय पावतो. म्हणूनच, ज्यांना असे मंत्रार्थ-दर्शन घडले त्यांना ऋषी असे म्हटले गेले. जो ज्या मंत्राचा ऋषी, त्याच्या ग्रंथात त्या मंत्राचे विवरण मिळते, असे मानले जाते. सामान्य मनुष्यांना वेदार्थ-बोध हा ऋषिप्रणीत ग्रंथांद्वारेच होतो. वेदांचे महत्त्व, त्यांचे स्वरूप, त्यांची अर्थपद्धती वगैरेच्या बाबतीत 'कल्याणच्या' 'हिंदू-संस्कृती' अंकात एक प्रबंध प्रकाशित झाला आहे, तो आपण पाहू शकता.

'मंत्र, ब्राह्मण आणि उपनिषद्' असे वेदांचे त्रिधा रूप सनातनधर्मी लोक मानतात. हे तिन्ही वेद आहेत. उपनिषद् आणि ब्राह्मणग्रंथात तर मूर्तिपूजेला खूपच महत्त्व आहे आणि त्याचे सविस्तर वर्णनही आहे.

(३४)

**महोदय,**

सादर हरिस्मरण. आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. आपण जीवनयात्रेचे जे संक्षिप्त विवरण लिहिले, ते वाचले.

आध्यात्मिक विचार हा रोग नाही. उलट ते सर्व रोगांवर रामबाण औषध आहे. पण समजा, आयुर्वेदाचा अभ्यास करणारा कुणी मनुष्य त्याचा उपयोगच करीत नसेल तर त्यात त्या विद्येचा काय दोष ? म्हणून आपण आध्यात्मिक विचारांनी निराश न होता, निश्चयाने ते विचार आचरणात आणा. या मार्गात यशाची सोबत आपोआपच मिळते. गीतेत तर म्हटलेच आहे -

**'स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ।'**

अर्थात् या कमयोगरूप धर्माचे अल्पसे आचरणही महाभयतारक असते. मग यात निराशेला वावच कुठे आहे ?

आपण तीन वर्षांच्या अध्ययनानंतर कर्मयोगाच्या मार्गावर पाऊल ठेवले, हे अगदी योग्यच केले; पण जेव्हा कर्मयोगाच्या क्षेत्रात उतरलात तेव्हा योग विसरून गेलात आणि फक्त कर्मच शिल्लक राहिले. कर्माला योगाची साथ मिळाली असती तर पुत्र-वियोगाने आपणास यत्किंचितहि दुःख झाले नसते.

पुत्रवियोगाच्या आधीच्या काळात आपणास कर्मक्षेत्रात उत्तरोत्तर यश लाभत गेले, आपली ऐहिक उन्नती होत गेली, त्यामुळे आपण सांसारिक भोगात अधिकाधिक गुरफटत गेलात. मरणाच्या भीतीने आपणास जे वैराग्य निर्माण झाले होते आणि आपण आध्यात्मिक विचारास प्रवृत्त झाला होता, तेही त्या आसक्तीमध्ये दबून गेले. अशा स्थितीत आपणास सावध करण्यासाठीच देवाने हा नवा प्रसंग घडवून आणला. या सगळ्याला आपण आध्यात्मिक अपयश मानता, ही आपली चूक आहे. या घटनेस आपण परमेश्वराचा अनुग्रह मानून सावध व्हायला हवे होते आणि असे मानायला हवे होते की, या जगात कोणतीही परिस्थिती, कोणतीही

व्यक्ती अथवा कोणतीहि वस्तू शाश्वत नाही. सर्वांचा वियोग अनिवार्य आहे. इतकेच नव्हे तर ज्या शरीरास मनुष्य 'आपले' असे म्हणतो, तेदेखील त्याला सोडावे लागते. तर मग अशा क्षणभंगुर पदार्थांना सुख-साधने समजून त्यांच्याशी नाते जोडून, उपभोगामध्ये मनुष्यजन्म वाया घालवणे केवळ मूर्खपणाच नव्हे काय ?

ज्यांची प्राप्ती, रक्षण आणि भोग सगळेच दु:खकारक, दु:खाचे रूप फक्त वेगवगळे, अशा या पदार्थांत सुख आहेच कुठे? त्यांच्यातून सुखाची आशा करणेच मूर्खपणाचे.

अशा प्रकारे जगातील प्रत्येक परिस्थिती अनित्य आणि दु:खद आहे असे मानून त्यातून किंचिन्मात्र सुखाची आशा न बाळगता आपल्या कर्तव्यकर्मालाच जनता जनार्दनाच्या सेवेचे साधन मानून कर्म करीत राहाणे, हाच कर्मयोग होय. कर्माच्या मोबदल्यात लाभणारे पदार्थ व परिस्थिती यांच्या मोहात पडून धन हेच सुखसाधन आहे, असे समजणे हा कर्मयोग नाही. ( गीता २.३८,४७,४८,५० आणि गीताप्रेस प्रकाशित 'तत्त्वविवेचनी' मधील संबंधित उतारे.)

आपण असे समजून चालला आहात की, वेळेवर योग्य इलाज न मिळाल्यामुळेच पुत्राचा मृत्यू झाला. ही आपली चूक आहे. असे नसते. मरण हे विधिलिखित, विधानानुसारच होणार. त्यासाठी विनाकारण चिंता करू नका.

'माझे मन ताळ्यावर ठेव,' अशी जी प्रार्थना आपण वेळोवेळी देवाला करीत होता, ती देवाने ऐकली नाही, असे मानणे चुकीचे आहे. उलट आपला 'पुत्रवियोग' हे त्याचे आपल्याकडे लक्ष असल्याचे द्योतक आहे. तसे झाले नसते तर आपणास आपल्या चुकीची आणि स्वत:च्या दुर्बलतेचीही जाणीव कशी झाली असती ?

आपण लिहिले आहे की, 'प्रतिकूल परिस्थिती, समयाभाव, आध्यात्मिक विचारांच्या मित्रांचा अभाव, विपरीत विचाराच्या लोकांची सोबत, शारीरिक व मानसिक दौर्बल्य आदी कारणांनी मी साधना करू शकलो नाही' हे काही खरे नाही. वर उल्लेख केलेल्या सगळ्या परिस्थितीत मनुष्य साधना

करू शकतो. ज्या साधकाच्या हृदयात, 'मला साधना करायची आहे' अशी प्रबळ इच्छा जन्म घेते त्याची प्रत्येक क्रिया साधनारूप होते. यालाच तर कर्मयोग म्हणतात. जे जे काही कर्म कराल ते सर्व समभावयुक्त साधना-अर्थात् 'योग' मानून करा. म्हणून कर्मयोगी साधकाला प्रत्येक परिस्थिती हे साधना-क्षेत्र असते. परिस्थिति-परिवर्तनाची त्याला जरूर भासत नाही. तो जे काही करतो, त्यासाठी त्याची आपली कार्यशक्ती आणि बळ त्याला पुरेसे असते. कारण तो कुणाच्या मदतीची अपेक्षा तर करीत नाहीच, उलट सगळ्या आकांक्षांचा त्याग करायला तत्पर असतो. दुसऱ्या शब्दात सांगायचे तर त्याची साधना कुणावर अवलंबून नसते.

आपण लिहिता की, 'अत्यंत नैसर्गिक होण्याच्या प्रयत्नात मी नैसर्गिक सुखापासूनही दूर गेलो आणि प्राकृतिक दु:खाचा भागीदार झालो.' तुमची ही धारणा चुकीची आहे, कारण प्राकृतिक सुख आणि दु:ख दोन्हीही क्षणभंगुर आहेत. सुखदु:ख अनित्य आहे. येते आणि जाते. आजपर्यंत कुणी अगदी महान वैभवसंपन्न आणि प्रतिष्ठित व्यक्तीसुद्धा प्राकृतिक सुखाने सुखी झाला नाही. ज्यांना आपण सुखी समजता, त्यांना विचारून पहा. इथे तर सगळीच फसवणूक आहे. प्राकृतिक भोगात सुख जर नाहीच, तर ते मिळणार कसे ? जगात आजवर कुणाकडचीही उणीव पूर्णपणे भरून निघाली नाही. कुठल्या ना कुठल्या अभावाची जाणीव शिल्लक असेल, तर दु:खाचा नाश होणार नाही. कारण अभावाची जाणीव हेच तर दु:ख आहे. म्हणून या गोष्टीची मनाशी खात्री बाळगा की, आध्यात्मिक विचारांच्या बैठकीमुळेच आपले काही नुकसान झाले नाही, उलट फायदाच झाला. आपण आपल्या आध्यात्मिक विचारांचा नीट सदुपयोग केला नाही, म्हणून पूर्ण लाभ झाला नाही.

साधकाला ना हिमालयात जायची जरूर आहे ना गृहत्याग करण्याची किंवा घाबरून जाऊन आत्महत्या करण्याची. त्याने ईशकृपेने प्राप्त परिस्थितीलाच साधन-सामग्री समजून तिचा विचारपूर्वक उपयोग करावा. कुठलीही परिस्थिती कमी दर्जाची मानू नये. ती परिवर्तनशील आहे असे समजून तिचा द्वेषही करू नये आणि तिच्यावर आसक्तही होऊ नये.

आपण विचारता की, 'आता मी काय करू ?' आपण स्वतःच या प्रश्नाचे उत्तर शोधा. ज्या साधनामार्गावर आपला दृढ विश्वास आहे, जो आपणास आवडतो आणि जो आपणास सहजसाध्य आहे तोच आपल्यासाठी योग्य आहे. माझ्या मते, ज्या साधनामार्गाचा आपण अवलंब कराल त्यात पुढील गोष्टी असणे आवश्यक आहेत - (१) देवाच्या ज्या नावावर आपली श्रद्धा आहे त्याचा जप, (२) देवाचे जे रूप आपणास प्रिय आहे त्याचे निरंतर स्मरण, आणि (३) साधना मार्गाचा निरभिमान.

आपण प्रकृती आणि परिस्थिती यांच्या बाबतीत चार गोष्टींबद्दल विचारणा केलीत. त्यांची उत्तरे खालीलप्रमाणे-

(१) गेल्या १७ वर्षात आपणास कोणत्याही रोगाने ग्रासले नाही. आता तुम्हीच सांगा, परमेश्वराची ही किती मोठी कृपा आहे. ही देवाचीच देणगी समजून आपण आपले जीवन सेवामय बनवायला हवे होते, भोगमय नाही. जो काळ वाया गेला तो गेला. त्याच्याबद्दल काही करता येत नाही. आता मागील घटनेपासून धडा घेऊन उर्वरित जीवन सत्कारणी लावावे.

(२) आपण लिहिता की, आपण स्वभावतःच निश्चल आणि सरळमार्गी आहात. ही तर देवाची मोठी कृपाच आहे आपल्यावर. लाख प्रयत्नांतीदेखील कुणा साधकाला असा स्वभाव लाभणे कठीण.

आपले असे मानणे अगदीच चुकीचे आहे की, 'कर्मयोग्याने कधी सरळस्वभावी असू नये. अशा स्वभावानेच माझे जिणे दुःखाचे झाले.' सरळ स्वभाव आणि निष्कपटता हे सद्‌गुण आहेत. त्यांनी कुणाचे जीवन दुःखमय होत नाही. कर्मयोगात तर सरळ स्वभाव आणि निष्कपटता अत्यंत आवश्यक आहे. कारण सर्वांचे हित हे कर्मयोग्याचे हित. सगळ्यांच्या सुखात त्याचे सुख. छल-कपटाशी त्याचा काय संबंध ?

(३) राजयोगाचा आपल्या दृष्टीने काय अर्थ आहे ? ज्या योगात सिद्धी प्राप्त होतात आणि योग्याला विशेष सामर्थ्य प्राप्त होते तो ? त्याला आपण राजयोग समजता ? असे असेल तर तो आपला गैरसमज आहे. ही गोष्ट गाठीस बांधा की, जगातला मोठ्यातला मोठा चमत्कार देखील

माणसाला सुखी बनवू शकणार नाही. सुख संग्रहात नाही, ते तर त्यागात आहे. म्हणून संकल्पांचा संपूर्ण त्याग, अर्थात् चित्तवृत्तिनिरोध म्हणजेच राजयोग.

**'योगश्चित्तवृत्तिनिरोध:'** (योग १.२)

(४) आपण लिहिता की, षड्रिपूमधल्या एका कामाखेरीज आपण कशाला घाबरत नाही. आपण यावर गंभीरपणे विचार करावा. काम जिवंत असताना क्रोधावर विजय कसा मिळेल ? मिळणेच शक्य नाही. तसेच जिथे काम, तिथे लोभ पण आहे. या शत्रूंच्यावर मनुष्य फक्त देवाच्या कृपेनेच विजय मिळवू शकतो. म्हणून साधकाने त्याच्या कृपेसाठी स्वत:ला योग्य बनविले पाहिजे. त्याच्या कृपेचा आदर केला पाहिजे. निरागस भावाने सर्वांवर कृपा करणारा देवाशिवाय अन्य कोणीही नाही. म्हणून श्रद्धापूर्वक त्याच्या कृपेची याचना करावी.

## ३५

**प्रिय महोदय,**

सप्रेम हरिस्मरण. आपले पत्र मिळाले. बृहद्धर्मपुराणानुसार -

**पुण्यवृक्ष महाभाग मालूर श्रीफल प्रभो।**
**महेशपूजनार्थाय त्वत्पत्राणि चिनोम्यहम् ॥**

या मंत्राने प्रार्थना करून बिल्वपत्रे तोडावीत आणि त्यानंतर

**ॐ नमो बिल्वतरवे सदाशङ्कररूपिणे।**
**सफलानि समाङ्गानि कुरुष्व शिव हर्षद ॥**

हा मंत्र म्हणून वृक्षाला प्रणाम करावा.

अमावस्या, पूर्णिमा, द्वादशी, संध्याकाळ, मध्याह्नकाल यासमयी बिल्वदळे तोडू नयेत. रात्री कुठलीही पानेफुले तोडू नयेत, हा तर एक व्यापक नियम आहे. बिल्ववृक्षाची फांदी तोडायची नसते.

आज तोडलेली बेलाचे पाने सहा महिन्यांपर्यंत वाहिली जाऊ शकतात. त्यानंतर ती शिळी मानली जातात.

पञ्चाक्षरी शिवमंत्राने बिल्वपत्र वाहावे, असा उल्लेख 'वीरमित्रोदया'

च्या 'पूजाप्रकाशा'त आहे. बिल्वपत्रे कोवळी, किड्यांनी न खाल्लेली, न फाटलेली असावीत. त्यात चक्र किंवा वज्र नसावे. बिल्वपत्रावर किडे पांढरी वाकडीतिकडी रेखा बनवितात त्याला चक्र म्हणतात आणि देठात शेवटी जी लहानशी गाठ असते तिला वज्र म्हणतात. ती गाठ तोडून टाकावी. वाहताना बिल्वपत्राचा चकचकीत भाग पिंडीकडे करावा आणि पानाची पाठ वरच्या बाजूला.

बिल्वपत्रावर काही लिहून वाहण्याबद्दल कुठे वाचण्यात नाही. काही लोक पानावर 'राम' असे लिहून वाहतात, त्याचा निषेधही नाही.

आपल्या हाताने गंध उगाळून स्वत:ला लावणे आणि स्वत: लिहिलेल्या पुस्तकाच्या हस्तलिखित प्रतीचा पाठ करणे, हे काही लोकांच्या मते अशुभ आहे. असे म्हणतात की, याने लक्ष्मीचा नाश होतो, म्हणूनच गंध उगाळून आधी देवाला लावायचा किंवा देवाला उद्देशून शिंपडायचा, तसेच हस्तलिखित पुस्तक देवासमोर ठेवून मग त्याचा पाठ करायची प्रथा आहे.

## ३६

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. आपण पूर्वी नास्तिक होता, त्यानंतर गीता वगैरे पुस्तके वाचून आस्तिक झालात, ही देवाची कृपा. आपले हे मानणे अगदी योग्य आहे की, कर्त्याशिवाय एवढे मोठे विश्वरूप कार्य कसे झाले आणि सूर्य, चंद्र, तारामंडळ, आकाश, वायू आदि जडतत्त्वे आपापली कामे नियमितपणे कशी करतात ? म्हणून याचा कुणीतरी निर्माता आणि संचालक अवश्य आहे आणि तोच परमेश्वर आहे. मनात हा विश्वास दृढ राखावा.

अचेतन प्रकृती ज्ञेय आहे आणि सचेतन त्याचा ज्ञाता व प्रेरक आहे. म्हणून अचेतनातून सचेतनाची उत्पत्ति होते, असे मानणे अगदीच असंगत आहे.

आपण गीतेवर अनेक भाष्ये आणि टीकाग्रंथ वाचले, तसेच तत्त्वज्ञानविषयक पुस्तके चाळली, ही खरोखर भाग्याची गोष्ट आहे.

वेदांतदर्शनाचे अनुवादासहित प्रकाशन गीताप्रेसद्वारा केले गेले आहे. नऊ उपनिषदेदेखील टीकेसह प्रकाशित झाली आहेत. जर ही दोन्ही पुस्तके आपण पाहिली नसतील तर अवश्य पाहावी; त्यात आपल्या काही शंकांचे निरसन होऊ शकेल.

आपण म्हणता की, 'गीतेमधील अनेक श्लोक द्वैताचे समर्थन करतात आणि अनेक अद्वैताचे. त्यामुळे कशाचे अनुसरण करायचे, याचा प्रश्न आपणांस पडला.' दोन्हींचे फळ एकच असल्याचे प्रतिपादन केले आहे. त्यात काही फरक नाही. जेव्हा दोन्ही मार्ग एकच आहेत असे म्हटले जाते, तेव्हा त्याचा संदर्भ फळाविषयी असतो. मार्गाविषयी एकतेचा गैरसमज करून घेऊ नये.

श्रीशंकरस्वामी कर्मयोगाला केवळ अंत:करणशुद्धीचे साधन मानतात, त्यांच्या दृष्टीने त्यांच्या अनुयायींसाठी त्यांचे हे मत ठीक आहे. कर्मयोग आणि भक्तियोगाच्या फलस्वरूप ज्ञानप्राप्ती होते, असे जे गीतेत सांगितले आहे, तो ज्ञानयोग नव्हे. हे तेच ज्ञान आहे, जे ज्ञानयोग, ध्यानयोग, कर्मयोग आणि भक्तियोग इत्यादी सर्वांच्या फलस्वरूप प्राप्त होणारे यथार्थ ज्ञान आहे. ही गोष्ट मनात रुजली की, गीतेचे तात्पर्य लक्षात येणे अगदी सोपे आहे.

आपण विचारता की, 'श्रीरामानुजाचार्य आणि श्रीवल्लभाचार्यांसारख्या महापंडितांनी शांकरभाष्याचा विरोध कसा काय केला ?' याचे कारण हे असू शकेल की, त्यावेळच्या आचार्यांसमोर जे अनुयायी होते, त्यांच्या कल्याणासाठी त्यांना जो साधनामार्ग योग्य आहे असे वाटले, त्याचा प्रचार त्यांनी केला. श्रीशंकराचार्यांच्यावेळी बौद्धमताचा बोलबाला होता. त्यामुळे नास्तिकता वाढीला लागली. श्रीबुद्धाची शिकवण नीट न समजल्यामुळे त्यांच्या शिष्यांनी चुकीचा प्रचार करून लोकात विनाकारण भ्रम निर्माण केला. तो भ्रमनिरास करण्यासाठी श्रीशंकराचार्यांनी अद्वैत आणि मायावाद यांचा प्रचार केला. वास्तविकपणे, असे करताना देखील ते अवतारवादाचे किती समर्थक होते, हे त्यांची स्तोत्रे आणि गीताभाष्याची प्रस्तावना वाचल्यावर समजून येईल.

वेगवेगळ्या पंथांची स्थापना, आपल्या आवडीनुसार, साधकांना

ऐहिक सुखांच्या लालसेतून मुक्त करून देवाच्या आराधनेत लावावे, या एकाच ध्येयाने केली गेली. त्यात गैर असे काहीच नाही. वाईट या गोष्टीचे वाटते की, विभिन्न पंथांचे साधकगण आपापल्या मतापायी एकमेकांचा द्वेष करून विनाकारण भांडणे उकरून काढतात.

आपण लिहिले आहे की, उपनिषदेदेखील शांकरमताचीच पोषक आहेत. परंतु असे काही नाही. ज्याप्रकारे गीता सगळ्या मार्गांची पुष्टी करते आणि सर्वांचे फळ एकच आहे असे मानते, त्याचप्रकारे उपनिषदे देखील सगळ्या साधनामार्गांची पुष्टी करतात आणि सर्वांचे एकच फळ आहे असेही मानतात. खरे तर दोन्हीत काहीच मतभेद नाहीत.

भगवान कृष्णांनी गीतेत जे म्हटले आहे की, '**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते** (४.३३)', त्याचा अर्थ असा की, वेगवेगळ्या साधनामार्गांचे अनुसरण करून केलेल्या सगळ्या कर्मांची पूर्ती शेवटी ज्ञानामध्ये होते. ज्या ज्ञानात सर्व कर्मांची पूर्ती होते, त्याचा अर्थ जर 'ज्ञानयोग' असा असता, तर भगवंतांनी चौथ्या अध्यायातील २४ व २५ व्या श्लोकात सांगितलेला ज्ञानयोगाचा मार्ग कर्मसिद्ध आहे, असे ३२ व्या श्लोकात म्हटले नसते. दुसऱ्या शब्दात, कर्म आणि साधनामार्ग हे दोन्ही एकच होत. कर्मयोग असो वा ज्ञानयोग, कुठलाही मार्ग फलरूप नाही.

कोणताही साधनामार्ग लहान-मोठा किंवा चांगला-वाईट नसतो, तद्वत, साधकदेखील ज्ञानयोगाचा उत्तम, भक्तियोगाचा मध्यम किंवा कर्मयोगाचा निकृष्ट असेही नसते. प्रत्येकाची आवड, बळ आणि विश्वास वेगवेगळे असतात. म्हणूनच साधनामार्गातदेखील भिन्नता असणे आवश्यक आहे. म्हणून साधकाचा ज्या मार्गावर विश्वास, श्रद्धा व रुची असेल आणि जो त्याला सोपा वाटतो, तोच मार्ग त्याच्यासाठी सर्वश्रेष्ठ. साधकाने प्रथमतः आपली सांप्रत स्थिती पडताळून पाहावी. मनामध्ये तऱ्हेतऱ्हेच्या दोषांचा संग्रह असतो, सद्गुणांचा गर्व असू शकतो, त्यांचे सखोल निरीक्षण करावे. परमेश्वरी कृपेने प्राप्त झालेल्या आपल्या सदसद्विवेकबुद्धीचा उपयोग करून, एक एक करून दोषांचे समूळ उच्चाटन करीत जावे. मन संपूर्ण दोषरहित

होईपर्यंत त्याच काळजीत राहावे. जर आपण या कामात दुर्बळ पडतो आहोत असे वाटले, तर त्या सर्वशक्तिमान प्रभूची मदतीसाठी प्रार्थना करावी.

**'सर्वधर्मान् परित्यज्य'** चा अर्थ असा नाही की, धर्म आणि कर्माचा त्याग करावा. त्याचा वास्तविक अर्थ गीता ३.३०, १२.६ आणि १८.५७ च्या अन्वये असा आहे की, सर्व कर्मे कृष्णार्पण करावी. कारण शेवटी अर्जुनाने देखील **'करिष्ये वचनं तव'** असे म्हणून काय केले ? त्याने युद्ध करायचे सोडले का ? नाही. त्याने कृष्णाची शरणागती पत्करून युद्ध केलेच. म्हणून गीतेचे तात्पर्य - कर्मांचा त्याग करणे नाही, हे मनात नीटपणे ठसवावे. कारण जोपर्यंत शरीरात प्राण आहे तोपर्यंत कर्मांचा त्याग करणे शक्य नाही (गीता ३.५; १८.११). संन्याशालासुद्धा भोजन, मलमूत्रत्याग इत्यादी कर्मे आपल्या आश्रमधर्मानुसार करायला लागणारच. आपल्या साधनामार्गानुसार तो स्वत:ला त्या कर्मांचा कर्ता मानीत नाही, ती गोष्ट वेगळी.

**'कर्मणा बध्यते जंतुर्विद्यया तु विमुच्यते ।'**

ही उक्ती पण त्याच कर्मांना लागू आहे की, जी कर्तृत्वाहंकारपूर्वक, आसक्त होऊन आणि सकाम हेतूने केली जातात. आपण जरा गांभीर्याने विचार करा. श्रीशंकराचार्य स्वत: ज्ञानी पुरुष होते, हे तर नक्कीच; नसते तर त्यांच्या कथनाला काही महत्त्वच दिले गेले नसते. त्यांनीही आपल्या जीवनकालात कर्मांचा सर्वथा त्याग केला नाही. संन्यास घेतल्यामुळे त्यांनी जरी यज्ञयागादी नित्यनैमित्तिक गृहस्थोपयोगी कर्मे सोडली, तरी भिक्षा मागणे, भोजन करणे, शौचस्नानादी शारीरिक क्रिया, उपनिषद्-गीता आदींवर भाष्यलेखन, आपल्या सिद्धातांच्या प्रचारार्थ प्रवास, शास्त्रार्थ, उपदेश आदी करणे, वगैरे कामे ते करीत राहिलेच ना ? ही सगळी कर्मेच आहेत. म्हणून शरीर आहे तोवर लौकिक दृष्टीने कर्मे संपत नाहीत. आपल्या स्वभावानुसार शास्त्रोक्त कर्मे होत राहातात. त्यांचा कोणी कर्ता नसतो. हाच कर्मत्याग आणि त्याचेच दुसरे नाव संन्यास.

याखेरीज अकराव्या अध्यायातील ५४ व्या श्लोकात अनन्यभक्तीने देवाला जाणण्याबद्दल, बघण्याबद्दल आणि त्याच्या प्राप्तीबद्दल स्पष्टच लिहिले आहे. याशिवाय अनन्यभक्तीची लक्षणे ५५ व्या श्लोकात वर्णन

केली आहेत. इथेही ज्ञानयोगाची चर्चा नाही, संन्यासाश्रमाची नाही आणि लौकिक कर्मत्यागाचीही नाही. बाराव्या अध्यायात अर्जुनाने याच बाबतीत प्रश्न केला आहे आणि भगवंतांनी भक्ताला 'अत्यंत युक्त' असे विशेषण दिले आहे. यापूर्वी नवव्या अध्यायातील १३ व १४ व्या श्लोकातही भक्तीची चर्चा केली गेली आहे आणि त्यानंतर १५ व्या श्लोकात अन्य साधकांसाठी ज्ञानयोगाबद्दल सांगितले आहे. अशाप्रकारे दोन्ही साधनामार्गांचे स्वातंत्र्यही सिद्ध होते.

म्हणून ही गोष्ट मनात रुजवावी की, गीतेत कर्मत्यागाचा उपदेश नाही, उलट ज्ञानवंतांना देखील लोकसंग्रहासाठी कर्म करणे आवश्यक आहे, असेच सिद्ध होते. या संदर्भात तिसऱ्या अध्यायातील श्लोक २० ते ३० पर्यंत अभ्यासणे आवश्यक आहे.

आपण शंका प्रकट केली आहे की, आधी परमेश्वर निर्गुण होता, तर मग त्याला एकदम विश्वाची रचना करायची कल्पना कशी स्फुरली ? ते असे नाही. ईश्वर शाश्वत रूपाने सगुण पण आहे आणि निर्गुण पण. बीजरूपात सृष्टीचे अस्तित्व नेहमीच कायम असते. प्रलयकाळात जी सृष्टी अव्यक्तरूपात असते, ती रचनाकाळात प्रकट होते. ब्रह्मसूत्र आणि वेदांतदर्शनात यावरदेखील चर्चा केली गेली आहे.

भगवान भोक्ता नाही, हे पण ठीक आहे आणि तो भोक्ता आहे हेही बरोबर आहे. कारण गीतेच्या ५.२९ व ९.२४ मध्ये भगवंतांनी स्वतःला भोक्ता मानले आहे आणि त्याला भोक्ता समजण्याचे फळ परमशांती आहे, असेही म्हटले आहे. म्हणून त्याच्या या कथनाचे रहस्य समजून घेण्याचा प्रयत्न करावा. तो कर्म करूनदेखील अकर्ता आहे, भोगूनदेखील अभोक्ता आहे, संचार करतो तरी अचल आहे आणि जन्म घेऊनही अजन्मा आहे, त्यातच तर देवाचे देवपण आहे आणि त्यातच त्याचा मोठेपणा. त्याचे हे माहात्म्य ज्याच्या लक्षात आले, त्याला देव भेटलाच म्हणून समजा.

योग-सांख्यात जी २३ तत्त्वे मानली गेली आहेत, ती पुरुष वगळता फक्त प्रकृतीचीच २३ तत्त्वे आहेत. गीतेनुसार पण २३ तत्त्वेच आहेत (गीता १३.५). सातव्या अध्यायात प्रकृतीचे जे ८ प्रकार मानले गेले

आहेत, त्यानुसार इंद्रिये आणि इंद्रियविषयांनाही पंचमहाभूतांच्या अंतर्गतच मानले आहे. हाच काय तो फरक.

न्यायानुसार तत्त्वे १६, वैशेषिकानुसार ७. त्यातही फक्त वर्णनाचाच फरक आहे. एकाच प्रकृतीचे प्रकार उपप्रकार. सांख्यशास्त्रात ज्याला पुरुष म्हणतात, त्यालाच वैशेषिकात आत्मा असे म्हणतात. गीतेत त्याला परा प्रकृती, पुरुष, अक्षर, देही, शरीरी, क्षेत्रज्ञ आदी अनेक नावांनी संबोधले आहे.

पूर्वमीमांसा, वैशेषिक, न्याय, सांख्य, योग, वेदांत या सहाही शास्त्रांच्या मतांमधला जो भाग ठीक वाटला, तो गीतेने स्वीकारला. ज्या मुद्द्याचा विस्तार करावासा वाटला तो केला, जो भाग पटला नाही, त्याचा अनुल्लेख केला. म्हणूनच गीतेचा सिद्धांत सर्वमान्य झाला.

श्रीशंकराचार्यांनी कणादाच्या मताचे खंडन का केले, हे तर तेच सांगू शकतील. पण माझ्या मते साधकाने या मतामतांच्या वादात पडता कामा नये. त्याने फक्त, 'मला काय प्राप्त करायचे आहे आणि त्यासाठी मी काय करायला हवे ?' एवढाच विचार करावा.

ज्याची मुक्ती होते, त्याचा पुनर्जन्म होत नाही, ही गोष्ट बरोबर आहे. कारण त्याचे वेगळेपण शिल्लकच राहात नाही. जगाची उत्पत्ती, स्थिती आणि लय हा क्रम अनंत काळापासून चालत आला आहे आणि पुढे अनंत काळापर्यंत चालत राहणार. त्याच्या प्रारंभाचा आणि शेवटाचा कुणासही थांग नाही. स्वर्गलोक, देवलोक वगैरेचे जे वर्णन शास्त्रात आले आहे ते सगळे ठीक आहे. ही सगळी कर्मफळभोगाची स्थाने आहेत. आपण विचारता की, 'जोपर्यंत जीव मुक्त होत नाही तोपर्यंत त्याच्या कर्मानुसार त्याचा पुनर्जन्म अवश्य होतो, हे कशावरून ?' सगळ्या शास्त्रांत याचे स्पष्ट प्रमाण दिले आहे. आपणास कोणत्या प्रमाणाची अपेक्षा आहे ? स्पष्टपणे लिहा.

आपणास जर तर्काच्या आधारावर समजून घ्यायची इच्छा असेल तर कधीतरी प्रत्यक्ष भेटा. आपण बोलू. सगळ्या गोष्टी पत्राद्वारे समजावणे कसे शक्य आहे ? सविस्तर लिहिले तर त्याचेच स्वतंत्र पुस्तक होईल.

सावित्रीने आपल्या पातिव्रत्याच्या बळावर दिव्य दृष्टी मिळविली होती ?

म्हणून ती यमास पाहू शकली. त्यात आश्चर्य असे ते काय ? जर ती घटना सत्य मानली, तर तत्संबंधी सारे वर्णनही सत्य मानले पाहिजे.

आधी विश्वास ठेवायला पाहिजे. तर साधनेनंतर सत्य स्थिती लक्षात येईल. विश्वासाखेरीज कोणत्याही गोष्टीचे आकलन होत नाही, हा प्रकृतीचा नियम आहे. आपणास एखादी भाषा शिकायची असेल तर प्रथम त्या भाषेच्या लिपीवर विश्वास ठेवला पाहिजे. विश्वासाशिवाय अचानक एखादी भाषा आणि तिचे अर्थज्ञान प्राप्त होत नाही. हीच गोष्ट आध्यात्मिक विषयासही लागू पडते.

आपल्या आवडीप्रमाणे साधकाने कुठल्यातरी एका साधनामार्गावर विश्वास ठेवून साधनेची सुरुवात केली पाहिजे. साधना पूर्ण झाली की सगळ्या गोष्टींचा आपोआप उलगडा होतो. मग सगळ्या मार्गांचे एकत्व पण लक्षात येते. म्हणून माणसाने मतामतांच्या गोंधळात पडू नये. सगळे साधनामार्ग एका सत्यस्वरूप परमेश्वराची ओळख व्हावी यासाठीच आहेत. म्हणून कुठलाही मार्ग लहान-मोठा किंवा चांगला-वाईट नाही.

## ३७

**सादर सविनय हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. इथे सगळे आनंदात आहेत. आपण आनंदात असल्याचे समजले. मनुष्याला देवाचा विसर न पडणे हाच खरा आनंद.

आपल्या शंकांची उत्तरे अशाप्रकारे-

(१) परमेश्वराचे माहात्म्य अचिन्त्य आणि अनिर्वचनीय आहे. तो मंडलाकार असून सर्व प्राणिमात्रात भिन्नत्वाने निवास करतो, तरीही प्रत्यक्षात अखंड आणि एक आहे. म्हणून त्या सर्वशक्तिमान, सर्वरूप आणि सर्वांहून निराळ्या ईश्वराच्या बाबतीत अशक्य असे काहीच नाही.

(२) जनक-नंदिनी सीतामाईने जगाला अशी शिकवण दिली की, 'नामा'ला पहारेकऱ्याचे काम द्या. ती शिक्षक आहे, शिक्षार्थी नाही. इथे ईश्वराच्या ध्यानास स्पष्टपणे दरवाजा म्हटले आहे आणि सीतेने आपल्या चरणांकडे जी दृष्टी स्थित केली होती तिला किल्ली म्हटले असावे.

आपण यातील रहस्य जाणून घ्यायची इच्छा प्रकट केली आहे. आपली शंका मला नीट समजली नाही. मला तर यात सरळ सरळ असा अर्थ दिसतो की, सीतामाईच्या बाबतीत मारुती श्रीरामास म्हणतो की, आपल्या विरहात तिचे प्राण-पाखरू शरीर सोडून जाऊ इच्छिते, पण त्याला वाट सापडत नाही; कारण मुखावर नामाचा पहारा आहे, त्यांनी वाट रोखली आहे. हृदयात प्रभूचे ध्यान आहे, त्याने जणू हृदयाच्या कोठरीचे दरवाजे बंद केले आहेत. सीतामाईची दृष्टी स्वत:च्या चरणांवर खिळली आहे. मग प्राण बाहेर तरी कुठून जाणार ?

(३) अविरल-भक्ती म्हणजे अनन्य प्रेमाचा अभ्यास नाही. अविरल, अनन्य प्रेम ही भावना आहे. अभ्यासाच्या सहाय्याने एकत्र होऊन केलेल्या भक्तीस अविरल-भक्ती म्हणता येणार नाही. म्हणूनच कवी म्हणतो की, योगीश व मुनिजन या भक्तीच्या शोधात फिरतात, पण अविरल-भक्ती केवळ प्रभुकृपेनेच प्राप्त होते.

(४) भगवान शंकर श्रीरामाच्या नामाचे उपासक होते, ही गोष्ट रामायणात संत तुलसीदास यांनी जागोजाग सांगितली आहे.

नामजपाचे अनेक प्रकार आहेत. प्रेमपूर्वक आपल्याआपण होणारे नामस्मरण हे सर्वश्रेष्ठ मानले गेले आहे. आपण 'नाम म्हणजे काय' असे जे विचारले आहे, त्याचा अभिप्राय समजला नाही. म्हणून इथे त्याबद्दल एवढेच म्हणता येईल की, उपासकाच्या श्रद्धेनुसार नामात सगळे काही आहे. नाममहिमा व नामसामर्थ्य अनंत आहे.

(५) आदिकवी वाल्मीकीही श्रीरामाचे उपासक होते, असे मानले जाते. नामोच्चारण कंठाने, श्वासाने, मनाने, नाडीने आणि रोमारोमानेही करता येते. साधकाची योग्यता, विश्वास आणि प्रेम यानुसार त्यात अनेक प्रकार होऊ शकतात. प्राधान्य आहे विश्वास आणि प्रेम यांना. स्थान गौण आहे.

(६) रावणदेखील रामनामाचा जप करीत मृत्यू पावला. नामोच्चारण-स्थानाबद्दल पाचव्या प्रश्नाच्या उत्तरात लिहिलेच आहे.

(७) 'मणिदीप' हे समासयुक्त पद आहे. याचा भावार्थ लक्षात घ्यावा. हवेच्या झुळुकेने विझून जाणारा हा साधा तेलवातीचा दिवा नाही.

नामरूप दिवा हाच नित्य प्रकाशमय मणिरूप दीपक आहे. हा वाऱ्याने विझणारही नाही आणि याला पतंगही विझवू शकणार नाही. थोडक्यात सांगायचे तर हा दिवा अखंड प्रकाशमय राहातो.

(८) आपण पृच्छा केली आहे की, 'मन शांत कसे राहील ?' याचे थोडक्यात उत्तर असे की, कामनारहित झाल्यावरच मन शांत राहू शकते, अन्यथा नाही. केवळ देवावर भरवसा ठेवूनच मनुष्य सहजपणे कामनारहित नित्य-जीवन प्राप्त करू शकतो. ज्ञानमार्गात विवेकाने आणि योगमार्गात अभ्यास व वैराग्याने कामनारहित जीवन प्राप्त होऊ शकते. अर्थात् या कलियुगात हे इतके सोपे नाही.

मी माझ्या बुद्धीनुसार आपल्या प्रश्नांची थोडक्यात उत्तरे देण्याचा प्रयत्न केला आहे. वास्तविक उत्तरे देवालाच ठाऊक.

## ३८

**सादर प्रेमपूर्वक हरिस्मरण.**

'कल्याण'मध्ये माझा लेख पाहून आपणास समाधान वाटले, हे आपले प्रेम आहे. यात माझ्या लेखाचे महत्त्व गौण, पण आपली भावना आणि परमेश्वराची निरागस कृपा यांचे महत्त्व अधिक.

आपली कौटुंबिक परिस्थिती पण समजली. आपण आपल्या भावांना आणि त्यांच्या मुलांना आपले न मानता ईश्वराचे माना. तसेच स्वतःला पण त्या जगन्नियंत्याच्या स्वाधीन करावे, हे अधिक चांगले.

आपणास व्यापारात कधी यश मिळाले नाही, म्हणून काय झाले ? यालाही देवाची कृपाच समजावे. समजा, जर यश मिळाले असते तर कदाचित आपली आसक्ती आणि लोभ वृद्धिंगत झाला असता आणि आपण ईश्वराकडे वळला नसता.

काम करणाऱ्याला, धर्मपालन करीत करीत आपला उदरनिर्वाह करणे काही कठीण नाही. शरीरासाठी खर्च तरी असा किती लागतो ? आईवडील नाहीत, भावंडे आपापले काम चालवितात, आपण लग्नही केले नाही, मग एकट्याचा शरीरनिर्वाह कठीण का व्हावा ? मी नाही समजलो.

जर दुकानात नुकसान होते आहे, तर ते का होते आहे ? कारण शोधून धीराने ते दूर करावे. चिंता करून काय होणार आहे ? चिंता करून पैसा

थोडाच मिळतो ? म्हणून आपण धैर्याने, सत्य आणि धर्माच्या मार्गावर चालावे आणि संपत्तीला गौण मानून निर्लोभी व्हावे. दीनतेचे मुख्य कारण लोभ हेच आहे. आपल्या शरीरनिर्वाहाचा खर्च कमी करायचा प्रयत्न करा. दुकान स्वत:चे न मानता देवाचे माना. स्वत:ला देवाचा विश्वासू नोकर समजून दुकानाचे काम पहा.

घर सोडून जाण्यात काही फायदा नाही. एखाद्या धार्मिक संस्थेचे काम सेवाभावाने करा. मोबदल्यात फक्त जेवणखाण, कपडालत्ता एवढीच अपेक्षा बाळगली तर असे काम सहज मिळेल. म्हणून शरीरनिर्वाहाच्या काळजीने निराश व्हायचे कारण नाही.

अभावग्रस्त परिस्थिती ही जरी पूर्वकृत कर्माचे फळ असली तरी बुद्धिमान, प्रामाणिक आणि परिश्रमी माणसाला आपले पालनपोषण करणे इतके कठीण नाही.

जग कसे जरी असले तरी सरळ मार्गाने जाणाऱ्या माणसाला कुणीही अडथळा आणू शकत नाही; प्रकृतीचा तसा नियमच आहे. त्याला सुरुवातीस जरूर अडचणींना तोंड द्यायला लागते. पण जर तो आपल्या मार्गावर दृढ राहिला तर परिणामांती यश हे निश्चित. निराश मात्र होता कामा नये. लाभ आणि मोहामुळे अशांतीचा जन्म होतो, सदाचार आणि प्रामाणिकपणाने नाही.

सदाचारी आणि प्रामाणिक माणसाला आजकालच्या जगात भले कुणी महामूर्ख आणि बेअक्कल म्हणोत, पण वास्तविकत: तो बुद्धिमान आहे आणि त्याला नावे ठेवणारेच मूर्ख.

जर मनुष्य आसपासच्या ऐष आरामाच्या जाळ्यात सापडला नाही, तर त्याला मार्गच्युत व्हायला लागणार नाही. लोभ आणि मोहापासून दूर राहिला तर तो आपला निर्वाह मोठ्या मजेत करू शकतो.

जगात आजही असे व्यवसायी आहेत, जे अप्रामाणिकपणा, कपट, फसवाफसवी, विश्वासघात यांच्या वाटेलाही जात नाहीत, करचोरी करीत नाहीत आणि चांगल्या वस्तूत निकृष्ट वस्तूंची भेसळ पण करीत नाहीत. त्यांचाही व्यापार छान चालला आहे. ते आपला, कुटुंबाचा आणि नोकरचाकरांचा खर्चही मजेत चालवतात.

दुसरीकडे असेही दिसून येते की, खूप व्यापारी अप्रामाणिकपणा, फसवणूक आणि लबाडी करूनदेखील तोट्यात जात आहेत. यावरून हे सिद्ध होते की, पैसा मिळण्या - न मिळण्याचा संबंध फसवाफसवी आणि खोटेपणा करणे न करणे यांच्याशी नसून तो फक्त प्रारब्धाचा खेळ आहे.

डोक्यावर टोपली घेऊन किंवा हातगाडीवरून वस्तू विकणे वाईट नाही. जर त्याने निर्वाह चालत असेल, तर त्याला काय हरकत आहे ?

आपण तीस वर्षे देवावर आणि धर्मावर श्रद्धा ठेवलीत, हे छानच केलेत. त्याने आपला फायदाच झाला आहे. आपण माना किंवा न माना यात आपले अजिबात नुकसान झाले नाही.

आपण दु:खावेगात कधीकधी देवाला वाईट-साईट बोलता, त्यात गैर असे काहीच नाही. तो मोठा क्षमाशील आहे. अशा गोष्टींनी नाराज होत नाही. फार तर आपल्या पोरकटपणाला हसत असेल.

परमेश्वरी कृपेने, आपणास कितीतरी दु:खदायक आणि पतनकारक दुर्गुणांपासून वाचविले आहे, ही काय कमी भाग्याची गोष्ट आहे ?

स्त्रियांना आपण मातृवत् मानता ही चांगली गोष्ट आहे. पण या गुणाचाही कधी गर्व करू नका. यातही देवाची कृपाच समजा.

माझा आपला असा सल्ला आहे की, आपण देवावर भरवसा ठेवून निश्चिंत आणि निर्भय व्हावे, धन आणि ऐहिक वस्तूंना क्षणभंगुर समजून त्यांना गौण मानावे, निर्लोभी आणि निर्मोही व्हावे, प्रत्येक काम देवाचे आहे असे समजून त्याच्याच प्रेरणेने व त्याला संतुष्ट करण्याच्या दृष्टीने करीत राहावे आणि या सगळ्याचा परिणाम कसाही झाला तरी त्यात आनंदी राहावे.

## ३९

**प्रेमपूर्वक हरिस्मरण.**

आपले पत्र वेळेवर मिळाले होते, पण समयाभावामुळे बऱ्याचवेळा उत्तर देण्यास उशीर होतो. आपल्या प्रश्नांची उत्तरे खालीलप्रमाणे -

(१) साधकासाठी इंद्रियसंयम अत्यावश्यक आहे, म्हणून त्यात

गैरसावधपणा किंवा चुकारपणा करता कामा नये. कसेही करून मनाची समजूत घातली पाहिजे.

पापाचे फळ हे भोगायला लागणारच. मोठमोठ्या ऋषिमुनींना देखील आपल्या कर्माची फळे भोगायला लागतात. याला इतिहास साक्षी आहे.

परंतु निष्कामभावाने, मनापासून केलेली साधना वाया जात नाही आणि कधी नष्टही होत नाही, हा निश्चित नियम आहे. साधक दांभिक आहे, की तो खरीखुरी साधना करतो आहे, याचा निर्णय तो स्वत:च करू शकतो, कुणी दुसरा नाही. लोकांचे काय, ते खऱ्या साधकाला सुद्धा दांभिक मानतील किंवा एखाद्या दांभिकाला खरा साधक मानतील.

साधकाने स्वत:शी विचार करावा की, मी जी साधना करतो आहे ती देवास प्रसन्न करण्यासाठी करतो आहे की, लोकात स्वत:ची साधक म्हणून प्रसिद्धी करण्यासाठी? लोकांकडून, जेव्हा त्याच्या कानावर त्याचा मोठेपणा किंवा निंदा पडते, तेव्हा त्याचा त्याच्यावर काय परिणाम होतो ? तो जर खोटे बोलत असेल, तर कशासाठी ? तो परस्त्रीकडे वाईट नजरेने पहात असेल, तर का? या दोन्ही पापांचे मूळ कारण काय? जर साधना खरोखरीच निष्काम असेल, तर त्यात कामना असता कामा नये. जर कामना नष्ट झाली असेल, तर खोटे बोलणे किंवा परस्त्रीबद्दल कुदृष्टी किंवा कुविचार संभवत नाही. कारण कामनेपोटीच प्रत्येक पाप घडते. (गीता ३.३७). क्रोध आणि लोभ हीही तिचीच रूपे. ही तिन्ही नरकाची द्वारे आहेत. (गीता १६.२१). म्हणून साधकाने आपल्या मनातील कामनांचा नाश करून मन शुद्ध व निष्काम करणे आवश्यक आहे.

(२) साधनेची वेळ आणि साधना न करण्याची वेळ असे विभाजन ठीक नाही. साधकाने आपले सारे जीवनच साधनामय बनवावे. सकाळी उठल्यापासून रात्री झोपेपर्यंत जे जे काही करायचे ते देवाच्या आज्ञेनुसार, त्याने दिलेल्या शक्तीने आणि साधनसामग्रीने, त्याला प्रसन्न करायचे या हेतूनेच करावे. दुसऱ्याकडून सुखाची अपेक्षा करता कामा नये. आपल्या कर्तव्यपालनातून दुसऱ्यास सुख द्यावे. दुसरे लोक आपले कर्तव्यपालन करतात किंवा नाही याचा विचार करू नये.

मन पापातुर का आहे ? ते पापकर्मात क्षणिक सुखी का होते ? याचे एकमात्र कारण असे की, कामनापूर्तीमध्ये ते सुख मानते आणि कामनारहित झाल्यावर जो असीम आनंद प्राप्त होतो, त्याच्यावर त्याचा विश्वास बसत नाही. म्हणून साधकाने मनात असा विश्वास बाळगावा की, विषयभोगात खरे सुख मिळत नाही. कारण भोगेच्छा वाढत जाते. ती कधी संपत नाही. म्हणूनच भोगातून कुणी कधी सुखी होऊ शकत नाही.

(३) साधनेचे आपण जे महत्त्व ऐकले आहे किंवा शास्त्रात वाचले आहे, त्यापेक्षा कितीतरी अधिक आहे, पण खरे सांगायचे तर स्वत:ला साधक समजणारे आपण लोक फक्त साधनेचा अहंकार करतो, खऱ्या अर्थाने साधना करीत नाही. सर्वप्रथम साधकाने हा विचार करावा की साधना म्हणजे काय, आणि मी जे करतो आहे ते काय ? मी जो साधनामार्ग अवलंबिला आहे तो माझी आवड, शक्ती आणि विश्वासानुकूल आहे किंवा नाही ? स्वत:ला साधक मानायच्या भरात, मी दुसऱ्यांना साधनाहीन आणि तुच्छ तर लेखत नाही ? जर असा विचार माझ्या मनात येत असेल तर काय ही साधना आहे ? आपल्या सद्गुणांचा अहंकार बाळगणे आणि दुसऱ्यांचे दोष शोधणे याला कदापि साधना असे म्हणत नाहीत.

शास्त्रांवर श्रद्धा नसणे ही आमची मूर्खता आहे, बुद्धीचा दुरुपयोग आहे. देवाच्या अपार कृपेने मिळालेल्या विवेकशक्तीचा जर आपण आदर केला, दुष्कर्म करतेवेळी ईश्वर आम्हाला त्याची जाणीव देऊन जी चेतावणी देतो, ती ऐकून दुष्कर्मातून मन ओढून काढून, भविष्यात त्याची पुनरावृत्ती न करण्याचा जर दृढ संकल्प केला आणि देवाच्या दयेचा आदर बाळगून त्याच्या प्रेमात लीन झालो तर थोड्याशा साधनेने देखील एक महान् अनुभव प्राप्त होईल. याउलट, साधनेच्या नावाखाली जर आपण साधनाविरोधी कर्मे करायला लागलो आणि साधनेच्या सुखद परिणामाची अपेक्षा करीत राहिलो, तर ती अपेक्षा कशी पुरी होईल ?

साधना जर ओझ्यासारखी वाटत असली, अल्पकाळातच त्या साधनामार्गाबद्दल नावड निर्माण झाली, त्या मार्गावर आपली श्रद्धा आणि विश्वास नसला तर त्या साधनेची महान् उपलब्धी कशी प्राप्त होईल ?

साधकाने साधना जगायला शिकले पाहिजे. कोणत्याही परिस्थितीत साधनामार्गात उबाऊपणा, नावड किंवा वीट वाटता कामा नये, तरच तो साधनामार्ग पूर्णार्थाने उपयुक्त म्हणता येईल.

(४) मनुष्यजन्म मोठा दुर्लभ आहे, म्हणून हे जीवन नष्ट करायचा विचार करणेदेखील महापाप आहे. गंगेत बुडून मरण्याने जर मुक्ती मिळत असती तर फारच सोपा उपाय होता हा. पण असे नाही. म्हणून आत्महत्येची ही भावना मनातून हाकलून लावा. उद्धाराच्या आवश्यकतेची जाणीव होणे, हाच एक उपाय पापास उद्युक्त झालेल्या साधकाचा उद्धार करू शकेल. जर साधकाला असे वाटत असेल की, पापांपासून स्वतःचा बचाव करायला तो समर्थ नाही, तर त्याने स्वतःला दुर्बल मानून देवाला शरण जावे. तोच एक निराधाराचा आधार समजावा. सगळीकडून विश्वास आणि भरवसा संपवून एकमात्र देवावर भरवसा टाकावा आणि स्वतःच्या दुष्प्रवृत्तींच्या आवेगामुळे होणाऱ्या पापांच्या दुःखाने दुःखी होऊन देवासमोर शिशुवत् करुण रुदन करावे. जोपर्यंत देव दया दाखवीत नाही, तोपर्यंत बेचैन राहावे. जसे एखाद्या मुलाला एखादी वस्तू हवी असते आणि त्याला चैनही पडत नाही, तेव्हा ते मूल आईवडिलांसमोर हट्टाने रुदन करते; आणि आईवडीलदेखील ती वस्तू मुलास हानिकारक नसेल तर त्याचा हट्ट पुरा करतात, तशीच ही स्थिती समजावी. मातापित्यांपेक्षा देव कितीतरी दयाळू आहे. म्हणून निराश व्हायचे कारण नाही. केवळ आपल्या भक्तीच्या शक्तीवर देवाला वश करणे कठीण असले तरी देवाच्याच बळावर ते सहज शक्य आहे. तिथे फक्त श्रद्धा पाहिजे.

(५) नऊ दिवस रोज रात्री जागरण करून '**ॐ नमो भगवते वासुदेवाय**' या द्वादशाक्षरी मंत्राचा जप केल्याने आकाशचर सिद्धांचे दर्शन होणे, ही गोष्ट साधकाच्या विश्वासावर अवलंबून आहे. या मंत्रसिद्धीचा विधी जिथे लिहिला आहे तिथेच तत्संबंधी विवरणही पहावे. एखादा प्रयोग श्रद्धापूर्वक केला, तर त्याचे फळही अवश्य मिळायला हवे.

(६) माझ्या मते सध्या सगळ्यात मोठा महात्मा कोण आहे याबद्दल मी कलकत्त्याला असताना कुणाला सांगितल्याचे मला तरी आठवत नाही.

महात्मा कोण आहे, हे दुसऱ्या कुणास कसे समजणार ? माणसे तर एखाद्या महात्म्याला पण सामान्य मानू शकतील किंवा एखाद्या दांभिकाला महात्मा. मीही मनुष्यच आहे आणि मला हेही माहीत आहे की, माझाही या बाबतीतला अंदाज चुकला आहे. मग मी कसा कुणाला पटवून देणार की, अमुक मनुष्य सगळ्यात मोठा महात्मा आहे. ज्याला महात्म्याची जरूर असते, त्याला ईश्वरकृपेने आपोआप महात्मा भेटतो, असा माझा विश्वास आहे.

(७) गोवधबंदीच्या चळवळीबद्दल आपण जे लिहिले आहे, ते बव्हंशी बरोबर आहे. जे चालले आहे, ते देवापासून लपले नाही. प्रल्हादासारख्या भक्तावर किती अन्याय झाला ? परमेश्वर काय ते पहात नव्हता का? तरीही प्रल्हादाच्या मनात चुकूनसुद्धा असा विचार नाही आला की, देव असा कसा? आपल्याविरुद्ध आचरण करणाऱ्यांचा त्याला कधी थोडा तरी राग आला का? स्वप्नात तरी त्याला त्यांचा सूड उगवावासा वाटला का ? प्रल्हादाच्या मनात अंशमात्र तरी असा विचार आला का की, हे लोक माझ्यावर अत्याचार करीत आहेत ? मग, आपण तरी इतके अधीर का व्हावे ? आपण आपल्या कर्तव्यपथावर अटळ का राहू नये ? देवाने काय करायचे, ते त्याला ठरवू दे. आपण असा विश्वास ठेवावा की, देव कधी चुकत नाही. जे काही चालले आहे, ते त्याच्या नजरेसमोरच चालले आहे आणि देव जे काही करतो तेच योग्य असते. याबाबतीत तो असे का करतो आणि असे का करीत नाही, असा विचार करणे गोवधबंदीच्या कार्यकर्त्यांच्या हिताचे पण नाही आणि योग्यही नाही.

## ४०

**सादर हरिस्मरण.**

आपले दिनांक ६-१०-५४ ला लिहिलेले पत्र वेळेवर मिळाले होते, पण समयाभावामुळे उत्तरास उशीर होतो आहे.

आपल्या प्रश्नांची उत्तरे खालीलप्रमाणे-

(१) जीव आणि आत्मा यात वास्तविक काहीच अंतर नाही. वृद्धावस्थेत ज्याला जीव म्हणतात, तोच खराखुरा आत्मा.

(२) आत्मा किंवा जीव हा ब्रह्माचा अंश आहे, पूर्णब्रह्म नव्हे. उपासनेने पूर्णब्रह्माची प्राप्ती होऊ शकते. ज्याचे ध्यान डोळ्यांसमोर ठेवून पूजा केली जाते, त्यालाच ती पोहोचते. मनुष्य किंवा अन्य प्राण्याची पूजा जर ईश्वरी आज्ञा समजून आणि त्याच्या प्रसन्नतेसाठीच केली, तर तीदेखील देवपूजाच होय, परंतु आपण एखाद्या माणसाची किंवा प्राण्याची पूजा आपल्या स्वार्थासाठी केली तर ती देवपूजा नव्हे. म्हणजेच त्या पूजेला देवपूजेइतकी किंमत नसते. पूजा ही आत्म्याची नाही, शरीराची केली जाते. शरीर म्हणजे ब्रह्म नाही, तेव्हा यावर नीट विचार करावा.

(३) प्राण्यांना त्यांच्या चांगल्यावाईट कर्मांचे फळ देण्यासाठी ईश्वराने सृष्टीची रचना केली. म्हणून देवाला कुठल्याही प्रकारे दोष देता येणार नाही. जन्ममरणाच्या बंधनातून मुक्तीसाठीच, कृपावंत होऊन देवाने हे मानवी शरीर देऊन मुक्तीचा उपाय सांगितला. तरीही लोकांना मुक्ती नको असेल तर त्याला कोण काय करणार ?

(४) देश आणि गरिबांची सेवा करण्याचा आपला विचार खरोखरच प्रशंसनीय आहे. हे काम जर देवाला प्रसन्न करण्यासाठी म्हणून केले तर देव नक्कीच प्रसन्न होईल. गरीब आणि नि:सहाय लोकांना हीन लेखून दानीपणाच्या अहंकाराने त्यांची सेवा केली जात असेल, तर ते जरी एक शुभकार्य म्हणून मोजले गेले तरी, त्यायोगे ईशप्राप्ती किंवा जन्ममरणाच्या बंधनातून मुक्ती प्राप्त करून देणारा ईश्वरी प्रसाद मिळणार नाही. नामाचा जप केवळ देवाचे स्मरण राहावे म्हणून केला जातो, तो गरिबांच्या सेवेत बाधक कसा होईल ? त्याने अंत:करण पवित्र होते, देवाच्या ठायी प्रेम उत्पन्न होते आणि सेवाभाव जागृत होतो. म्हणून देशसेवेसारख्या कार्याची त्याच्याशी तुलनाच होऊ शकत नाही.

(५) प्रकृती आणि जीवात्मा या द्वयीस ईश्वराचे शरीर मानून ईश्वरास जीवात्म्याचाही आत्मा समजणे, आणि प्रकृती व जीव या दोन्ही शक्तींनी युक्त असा एक परमेश्वर मानणे - हा विशिष्टाद्वैताचा सिद्धांत आहे. या बाबतीत आणखी काय जाणून घ्यायची आपली इच्छा आहे, ते लिहावे.

(६) आत्मा हा ब्रह्माचा अंश आहे. ब्रह्म संपूर्ण आहे. वस्तुत: अभेद

असून देखील दोहोंच्या शक्तीमध्ये फार मोठा फरक आहे. शक्ती आणि सामर्थ्याचे मोजमाप भौतिक जगाच्या तुलनेत केले जाते. त्या भौतिक जगाची संपूर्ण रचना परमेश्वराच्या केवळ संकल्पाने होते. या गोष्टीचा विचार करणारा आणि त्याची बुद्धी हे सारे त्या परमात्म्याच्या रचनेचा एक क्षुद्रतम अंश आहे. त्याला ईश्वराच्या महिम्याचा थांग कसा लागेल ? त्याची बुद्धी तिथपर्यंत पोहोचू तरी शकेल का ?

(७) जीवात्मा हा परमात्म्याचा अंश आहे- असे वेद आणि उपनिषदात जागोजाग लिहिले आहे. तो एकच परमात्मा आपल्या अंशभूत अगणित जीवांना त्यांच्या कर्म आणि वासना त्यांच्या अनुसार विभिन्न योनींमध्ये निर्माण करतो आणि त्यांची कर्मफले ठरवितो. आपण अद्वैतवादानुसार या बाबतीत काय जाणू इच्छिता, ते स्पष्ट लिहा.

## (४१)

**प्रिय महोदय,**

सप्रेम हरिस्मरण. आपले पत्र मिळाले. वाल्मीकि-रामायण संस्कृतमध्ये आहे, हे आपणास माहीतच असेल. एखाद्या विद्वानाने किंवा संस्थेने, आपल्या धारणेप्रमाणे, अशा ग्रंथाचा अर्थ तोडूनमोडून लिहिला किंवा त्याच्या आपल्या मनाप्रमाणे टिप्पणी केली, तर त्याला काही इलाज नाही.

हे सगळ्यांना नक्कीच माहीत आहे की, श्री हनुमान आजकालसारखे साधे वानर नव्हते. ते वानरजातीचे होते. वाल्मीकि-रामायणात त्यांचा 'कपि', 'महाकपि', 'कपिकुंजर', 'प्लवंग' 'वानर' असा वारंवार उल्लेख आहे. या शब्दांचा अर्थ आपण शब्दकोषात पाहू शकता. असे कुठेही लिहिलेले नाही की, हनुमानाचे गोत्र 'वानर' होते. तसेच हेही आपणास माहीत असेल की, 'पुच्छ' किंवा 'लाङ्गूल' या शब्दांचा अर्थ ध्वज किंवा चाबूक असा होत नाही. श्रीहनुमान नेहमी आपल्याजवळ ध्वज किंवा चाबूक ठेवायचे असे वर्णनही कुठे नाही.

**'तस्य लाङ्गूलमाविद्धमतिवेगस्य पृष्ठतः।'**

(सुंदर. १.३४)

**'एवमुक्त्वा तु हनुमान् वानरो वानरोत्तमः ॥'**

(सुंदर. १.४३)

**'सुपर्णमिव चात्मानं मेने स कपिकुञ्जरः ॥'**

(सुंदर. १.४४)

**'स नानाकुसुमैः कीर्णः कपिः साङ्कुरकोरकैः ।'**

(सुंदर १.५१)

**'लाङ्गूलं च समाविध्दं प्लवमानस्य शोभते ।'**

(सुंदर. १.६१)

**'लाङ्गूलचक्रो हनुमान्.... ।'**

(सुंदर. १/६२)

हनुमानाच्या शेपटास जुने सुती कपडे लपेटून ते पेटवून दिल्याचे स्पष्ट वर्णन आहे. उदाहरणादाखल इथे दीड श्लोक देत आहे -

**कपीनां किल लाङ्गूलमिष्टं भवति भूषणम् ।**
**तदस्य दीप्यतां शीघ्रं तेन दग्धेन गच्छतु ॥**
**वेष्टयन्ति स्म लाङ्गूलं जीर्णैः कार्पासकैः पटैः ।**

इतकी उदाहरणे असताना जर कुणी हवे तसे अर्थ काढले तेही असे की, ज्यांचा त्या शब्दाशी काडीमात्र संबंध नाही - तर त्या अर्थांना, फक्त एक हट्टी प्रयत्न, असेच म्हणता येईल.

श्रीहनुमान् 'पवन-पुत्र' होते. म्हणूनच त्यांचे एक नाव 'मारुती' असे पडले. हे नाव वाल्मीकि-रामायणात वारंवार आले आहे.

**'विसृजन्तो महाकाया मारुतिं पर्यवारयन् ।'**

(सुंदर. ४३.१४)

त्यांस 'वातात्मज, मारुतात्मज' म्हटले गेले आहे -

**'आरुरोह हरिश्रेष्ठो हनुमान् मारुतात्मजः ॥'**

(सुंदर. ४३.३)

**'ततो वातात्मजः क्रुध्दो... ॥'**

(सुंदर. ४३.१५)

वाल्मीकि-रामायणातील या उताऱ्यांवरून ते 'पवनपुत्र' होते हे सिद्ध

होते. याचप्रकारे वाल्मीकि-रामायणात किंवा कुठल्याही प्राचीन ग्रंथात असा एकही शब्द किंवा वाक्य नाही, ज्यावरून असे म्हणता येईल की रावण हा चार वेद आणि सहा शास्त्रांचा ज्ञाता होता म्हणून त्याला 'दशमुख' हे नाव मिळाले. तसेच पूर्ण बलशाली असल्यामुळे त्यास 'वीस हाताचा' असे म्हटले जाई. वेदशास्त्र पारंगत ऋषींमधल्या कुणालाही 'दशमुख' म्हटले गेले नाही. तसेच परशुरामासारख्या पराक्रमी पुरुषाला देखील कुणी वीस काय पण 'चार हाताचा' देखील म्हटले नाही. म्हणून या सगळ्या कल्पना निराधार आहेत. रावण बहुरूपी नव्हता. वाल्मीकि-रामायणात त्याच्या दहा डोक्यांचा आणि वीस हातांचा उल्लेख आहे. तो कामरूप म्हणजे इच्छेनुसार रूप बदलण्याची शक्ती प्राप्त असलेला होता हे निश्चित. रावणाच्या जन्माच्या वेळचे हे वर्णन पहा -

**दशग्रीवं महादंष्ट्रं नीलाञ्जनचयोपमम् ।**
**ताम्रोष्ठं विंशतिभुजं महास्यं दीप्तमूर्धजम् ॥**

(उत्तर. ९.२९)

जन्मत:च रावण चार वेद सहा शास्त्रांचा ज्ञाता झाला नसणार. वाल्मीकि-रामायणात जागोजाग त्याला दशग्रीव, विंशतिभुज म्हटले गेले आहे. तो एकाच वेळी दहा धनुष्ये घेऊन युद्ध करायचा, असेही स्पष्ट वर्णन आहे. आपणास अधिक पुरावा आणि वाल्मीकि-रामायणाचा बरोबर अर्थ हवा असेल तर सार्थ रामायणाचे पुस्तक वाचले पाहिजे. एखाद्या ग्रंथालयातून सटीक वाल्मीकि-रामायण आणून ते अभ्यासावे.

## ४२

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला.

आपल्या प्रश्नांची क्रमवार उत्तरे अशी -

श्रीमद्‌भगवद्‌गीतेचे माहात्म्य अठराव्या अध्यायात स्वत: श्रीकृष्णांनी ६८ ते ७१ श्लोकांत व संजयाने ७४ ते ७७ या श्लोकांत सांगितले आहे. म्हणून गीतापठणाबरोबरच माहात्म्यपाठ पण आपोआपच होतो.

आपल्या गावी पाण्याची टंचाई असेल तर आपण रात्री, लोकांची गर्दी नसेल तेव्हाच, पाणी भरून ठेवावे.

आपण जर आपली राहती जागा बदलणार असाल तर आपल्या आराध्य दैवताची प्रतिमा बरोबर नेऊन, जिथे राहाल तेथे तिची स्थापना करावी. त्यात काही अडचण नाही.

ज्याला देवाचा तीर्थप्रसाद घ्यावा किंवा घेऊ नये, अशी शंका असेल, त्याने तो घेऊ नये.

आपण आपल्या प्रात:कालच्या नित्यकर्माबद्दल लिहिले आहे, ते ठीक आहे. संध्याकाळीदेखील जर स्नान शक्य नसेल, तर हात, पाय, तोंड धुऊन, संध्या आणि गायत्री जपाची किमान एक माळ, यासाठी वेळ काढणे चांगले.

राधाकृष्णाच्या पंचामृतात (किंवा तीर्थात) अन्य देवांची पंचामृते (किंवा तीर्थे) मिसळू नयेत.

वालीच्या मृत्यूनंतर त्याची पत्नी तारा सुग्रीवाची पत्नी झाली आणि रावणाची पत्नी बिभीषण-पत्नी झाली, ही गोष्ट खरी आहे. सगळ्या रामायणांनी या गोष्टीचे समर्थन केले आहे. तेव्हा वानरजातीमध्ये व राक्षसजातीमध्ये अशी प्रथा होती. त्यात काही गैर नाही.

मोहरीमिश्रित भोजन तामसी नसून राजसी मानले जाते.

यज्ञोपवीत तुटले आणि दुसरे जवळ नसेल तर ते लवकरात लवकर मिळवायचा प्रयत्न करावा आणि जोपर्यंत दुसरे मिळत नाही, तोपर्यंत अन्नपाणी घेऊ नये व मौन राहावे. जानवे-जोडातील फक्त एकच जानवे तुटले असेल तर घरी येऊन बदलावे. त्यात पथ्याची आवश्यकता नाही.

विधवा, विवाहाचे समर्थन करू नये. विधवांना पूर्ण चांगली वागणूक आणि उत्तम शिक्षण दिले पाहिजे.

सत्ययुगाच्या आगमनाची वार्ता सर्वथा निराधार आहे. कुणी असली बाष्कळ बडबड केली तर ती त्याची चूक आहे. म्हणून त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करावे. जग परिवर्तनशील आहे. सगळ्या गोष्टी बदलत असतात. म्हणून विज्ञानविषयक गोष्टींचा उल्लेख पुराणात मिळाला नाही, तर त्यात आश्चर्य कसले ? जे आज मिळत नाही ते पुढे कधीतरी मिळेलही. जेव्हा

विमानाचा शोध लागला नव्हता, तेव्हा पुष्पक आणि सौभ विमानादी गोष्टींवर बऱ्याच लोकांचा विश्वास नव्हता. आता आहे. त्यात नास्तिकपणा कसला ? आधुनिक विज्ञानदेखील अपूर्ण आहे.

गाडी चालवणारा काळजीपूर्वक चालवीत असेल, मध्ये येणाऱ्या प्राण्यांना वाचवायचा प्रयत्न करीत असेल, तर त्याचा काही दोष नाही. मरणाऱ्या जीवांचे ते प्रारब्ध होते, असे समजावे.

कवीच्या वाईट कवितेमुळे जर लोकांचे पतन झाले, तर ते कवीचे पाप. हे पातक त्याला नरकात टाकू शकते. धार्मिक कविता किंवा देवाचे भजन, भक्ती आणि ईशचरितादीबद्दल कविता केली, तर त्याचे उत्तम फळ मिळते. काव्यरचनेत वाईट काहीच नाही. तसेच चित्रांकनही वाईट नाही. महर्षी वाल्मीकी आणि भगवान व्यास हेही तर कवीच होते.

श्रद्धा आणि प्रेमाने दिलेला शिधा, वस्त्र आदी, दाता आणि ईश्वर यांच्या आनंदासाठी, कुणाकडूनही निष्काम भावाने घ्यायला काहीच हरकत नाही.

आजकालच्या काळात आपल्याला जो सत्पात्र वाटेल, त्याला दान द्यावे. श्राद्धाच्या भोजनास विद्वान आणि सदाचारी ब्राह्मणास बोलावणेच उत्तम.

ट्रेनिंगमध्ये सर्वांबरोबर जेवणेखाणे ठीक नाही, आपल्या खर्चाने वेगळी व्यवस्था करावी. नोकरीच्या लालसेने धर्माचा त्याग करू नये. आपण वेगळ्या एका पत्रात लिहिले आहे की, संसाराला मन विटले आहे. त्यात वाईट काहीच नाही. संसारातून विरक्त होऊन मन जर देवाठायी लागले तर मी मोठी भाग्याची गोष्ट आहे. मृत्यू समीप आल्याचे दिसणे तर खूप चांगले, पण त्याची भीती नसावी. छातीत धडधड होणे, घाबरल्यासारखे वाटणे हे निश्चितच वाईट. देवावर विश्वास ठेवणाऱ्याने कधी कुणाला घाबरू नये. भगवान श्रीकृष्णाचे नाव घेतल्याने शांती मिळते, ही चांगली गोष्ट आहे. म्हणून देवाचे स्मरण निरंतर करीत राहावे, म्हणजे पुन: रोगाचा हल्ला होऊच शकणार नाही.

## ४३

**सादर हरिस्मरण.**

आपले पत्र वेळेवर मिळाले होते. समयाभावाने बऱ्याचवेळा पत्रोत्तरास उशीर होतो.

आपण मनुष्यजन्माचे महत्त्व आणि कर्तव्य याबद्दल विचार करता, हे खरोखरीच चांगले आहे. मनुष्यजन्माचे महत्त्व असे की, जे काम या जीवनात करता येते, ते अन्य कोणत्याही जन्मात शक्य नाही. कारण बाकी सारे जन्म केवळ कर्मफळाच्या भोगासाठी मिळतात. त्या जन्मांमध्ये मनुष्यजन्मात केलेल्या चांगल्यावाईट कर्मांची फळे भोगली जातात. नव्या कर्मांची जुळणी किंवा आत्मकल्याण या गोष्टी बाकी जन्मांत शक्य नसतात.

आपल्या देशाबद्दल विचार करणे चांगले आहे, परंतु समस्त प्राणिमात्राच्या हिताचा विचार आणि निरपेक्ष वृत्ती त्याहूनही श्रेष्ठ. कारण फक्त कामनारहित व्यक्तीच पूर्णत: स्वतंत्र असू शकते. जोपर्यंत मनुष्याला दुसऱ्याकडून काही अपेक्षा असते, तोपर्यंत तो दुसऱ्याच्या आधीन राहतो. पराधीनतेत सुख नाही. तसेच फक्त कामनारहित मनुष्यच परमपदास पोहोचू शकतो.

आपली सभ्यता आणि संस्कृती मनुष्याला शाश्वत आनंदाप्रत आकर्षित करते, म्हणून ती श्रेष्ठ आहे. म्हणून त्यांचा विचार आत्मकल्याणार्थ करावा.

राष्ट्र आणि समाज यांचा विचार करणे पण सर्वांच्या हिताच्या दृष्टीने योग्य आहे.

तसेच, पुरुष व स्त्री यांच्याबाबतीत देखील सर्वांच्या हिताच्या दृष्टीने विचार केला पाहिजे.

ईश्वर आणि जीव यांच्याविषयी आपली काय विचारसरणी आहे आणि त्याचा आत्तापर्यंत काय परिणाम समोर आला, हे जरूर लिहावे.

सर्व प्रकारच्या दु:खातून कायमची मुक्ती मिळून परमशांती व परमानंदाची प्राप्ती करून घेणे हा मनुष्यजन्माचा उद्देश आहे. यालाच ब्रह्मप्राप्ती किंवा

ईश्वरप्राप्ती असेही म्हणतात. प्रलयकाळी जेव्हा समस्त प्राणी एकाकार होतात, त्या समयी जीव आपले अज्ञान बरोबर घेऊनच परमात्म्यात विलीन होतो आणि जगाच्या पुनरुत्पत्तीच्या वेळी पुन: आपल्या पूर्वकृत कर्मांच्या अनुसार कर्मफळे भोगण्यासाठी तऱ्हेतऱ्हेच्या योनींमध्ये जन्ममरणाच्या फेऱ्यात पडतो. म्हणून प्रलयकाळची एकाकारता म्हणजे मुक्ती नव्हे. त्या एकाकाराने कुणाचा काही फायदा होत नाही. ते तर एका प्रकारे झोपून उठण्यासारखे आहे. त्यावेळी जीव आणि ब्रह्म यातला फरक शिल्लक राहात नाही असे नाही. जीवाचा संबंध अज्ञानाशी असतो.

जीवात्मा हा ब्रह्माचा अंश आहे, तरीही अनादिकालापासून त्या प्रभूपासून वेगळा आहे. जोपर्यंत देवाची ओळख पटत नाही तोपर्यंत त्याला शांती मिळत नाही. रूप-यौवन, धन-संपत्ती, मोठा हुद्दा वगैरेचे वस्तुत: काहीही महत्त्व नाही. कारण या सगळ्या नाशवंत गोष्टी आहेत आणि त्यांचा वियोग निश्चित आहे. खरे तर या सर्वांत सुखाचा गंधदेखील नाही. कारण अभावात दु:ख आहे आणि जोपर्यंत पूर्णत्वाची प्राप्ती होत नाही तोपर्यंत मनुष्याला अभावाची जाणीव होतच राहते.

जर मनुष्य महान कलाकार झाला, तर त्याच्यापेक्षाही मोठा असा कलाकार जगात कुठेतरी असणारच आणि शिवाय त्याची कला, प्रतिभा हीही कायम तशीच राहणार नाही. तसेच कवी, राजकारणी, शास्त्रज्ञ, काही जरी झाले तरी शांती मिळेलच असे नाही. सर्वात श्रीमंत असा कुणी एकजण असणे शक्य नाही. कारण थोड्याफार फरकाने कुणी मोठा, कुणी लहान राहणारच. प्रकृतीचा स्वभाव आहे हा आणि समजा कुणी सर्वोच्च लक्ष्मीपती झालाच, तरी त्यानेही शांती मिळत नाही.

आपण जर आपली विचारधारा थांबवू शकत नाही तर तिचा सदुपयोग करा. मनात संसाराचे चिंतन न करता परमात्म्याचे चिंतन करा. म्हणजेच आपल्या जीवनाची दिशा परमात्म्याकडे वळवा. त्याने दिलेली शक्ती त्याच्या आज्ञेनुसार त्याच्याच सेवेत समर्पित करावी, हाच मनुष्य-जन्माचा सदुपयोग आहे.

सर्वांचा केंद्रबिंदू तो परब्रह्म परमात्माच आहे; त्याच्याच शक्तीने

सृष्टीची उत्पत्ती, पालन आणि संहार होत राहतो. ॐच्या पलीकडे तोच आणि ॐस्वरूपही तोच. महान् योगशक्ती ही त्याचीच शक्ती आहे. शक्ती आणि शक्तिवान यात वस्तुत: काही फरक नाही.

विराट रूप दिसणारा परमेश्वर कुणाचा अंश नाही. तो साक्षात परब्रह्म परमात्माच आहे.

वेद, पुराणे आणि उपनिषदे मनुष्याला त्याचे कर्तव्य समजावून देण्यासाठी प्रकट झाली आहेत.

कुठलाही चित्रकार चित्रात प्राण फुंकू शकत नाही. ते काम सृष्टिकर्ता ईश्वरच करू शकतो.

## ४४

**सादर हरिस्मरण.**

आपले पत्र वेळेवर मिळाले. आपल्या प्रश्नांची उत्तरे खालीलप्रमाणे-

(१) गृहस्थाश्रम सगळ्यांनाच आवश्यक आहे, असे नाही; पण जे गृहस्थाश्रमास योग्य आहेत, त्यांच्यासाठी तो आवश्यक आहे. त्याचप्रमाणे योग्यतेनुसार वानप्रस्थ व संन्यासाश्रम देखील आवश्यक असल्याचे सांगितले गेले आहे. म्हणूनच सगळ्या शास्त्रांत, आश्रमांचे वेगवेगळे वर्णन केले आहे आणि त्यांचा क्रमही सांगितला आहे. परंतु वानप्रस्थ आणि संन्यासाश्रमाचे पालन आजकाल शास्त्रोक्त पद्धतीने होणे कठीण आहे.

(२) परमेश्वराच्या साक्षात्कारासाठी सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहे - प्रकर्षाने त्याच्या साक्षात्काराची आवश्यकता जाणवणे. ती जाणवल्यावर आपल्या स्वभावानुसार साधकास जो मार्ग अनुकूल वाटतो, देवाच्या ज्या नामारूपावर त्याचा विश्वास आहे आणि त्याला जे आवडते, तसेच जो मार्ग त्याच्या आवाक्यातला आहे, तोच त्याच्यासाठी सर्वात उत्तम. कोणताही मार्ग लहान किंवा मोठा नसतो. त्या साधनामार्गात श्रद्धा, प्रेम आणि भाव यांची आवश्यकता आहे.

(३) माझा असा विश्वास आहे की, ज्यांनी देव प्रत्यक्ष पाहिला आहे, असे लोक या जगात अवश्य आहेत, परंतु अशा लोकांशी आपली भेट

घडवून आणण्यास मी असमर्थ आहे. कारण सगळ्यांची श्रद्धा, प्रेम आणि विश्वास एकसारखे नसतात. म्हणून, मी जर म्हटले की अमुक माणसाला देवाचा साक्षात्कार झाला आहे, तर ते आपण मानालच अशी खात्री नाही.

(४) जे स्वातंत्र्य आपल्याला मिळाले आहे ते खरेखुरे स्वातंत्र्य नाही. ते तर पारतंत्र्याचेच दुसरे रूप आहे. खरे स्वातंत्र्य सामूहिक नसते, ते व्यक्तिगत असते आणि जो सर्वप्रकारे निरिच्छ होतो त्यालाच ते प्राप्त होते. ज्याचे जीवन आणि मार्ग दुसऱ्या कुणावर अवलंबून नसतो, जो कुणाकडूनही कशाचीही अपेक्षा करीत नाही, तोच खऱ्या अर्थाने स्वतंत्र आहे. देवाने आपल्या उच्चाधिकाऱ्यांनाच नव्हे तर प्रत्येक माणसाला विवेकशक्ती दिली आहे आणि त्या विवेकशक्तीच्या सदुपयोगाने प्रत्येक मनुष्य उन्नतीच्या शिखरावर आरूढ होऊन खरेखुरे स्वातंत्र्य प्राप्त करून सदासुखी होऊ शकतो. परंतु कुणी जर देवाने दिलेल्या विवेकचक्षूंचा उपयोगच नाही करायचा असे ठरविले, तर त्यात देवाचा काय दोष ?

(५) खऱ्याखुऱ्या संतांची संगत लाभावी, यासाठी त्यांच्या संगतीची अनन्य इच्छा निर्माण होणे जरूरी आहे.

(६) गृहस्थाश्रम किंवा अन्य कोणताही आश्रम ईश्वर-भक्तीमध्ये अडथळा निर्माण करीत नाही. देवाचा भक्त ज्या आश्रमात व परिस्थितीत असेल ती तशीच देवाचा प्रसाद समजून, तिचा सदुपयोग करून, देवाला प्रसन्न करू शकतो. भक्तीसाठी फक्त श्रद्धा, प्रेम आणि भाव हवा. आश्रम आणि परिस्थितीचा त्यात काही संबंध नाही. भक्त प्रल्हाद हिरण्यकशिपूसारख्या राक्षसाच्या घरी जन्माला येऊनसुद्धा निराश झाला नाही. म्हणूनच 'ईश्वरभक्तीमध्ये गृहस्थधर्माची अडचण होत असेल, तर गृहस्थाश्रम सोडावा की भक्ती सोडावी' असा प्रश्नच उद्‌भवत नाही. कारण भक्त हा भक्ती सोडूच शकत नाही आणि गृहस्थाश्रमाचा भक्तीमध्ये अडथळा निर्माण होत नाही; म्हणून तोही सोडण्याबद्दल किंवा न सोडण्याबद्दल बोलायचेच कशाला ?

(७) मी साधारणपणे दर वर्षी एप्रिल ते जूनअखेरपर्यंत सत्संगासाठी ऋषिकेशला गीताभवनात राहतो. आपणास सोईस्कर असेल तर आपण

तिथे येऊ शकता. सत्संगात भाग घेणाऱ्या प्रत्येकाची तिथे आवश्यक ती सगळी सोय असते.

माझे तर असे ठाम मत आहे की, आपण आपली आवड आणि विश्वासानुसार ईश्वराच्या कुठल्याही नावाचा जप आणि कोणत्याही स्वरूपाचे ध्यान करू शकता. त्यात विश्वास आणि प्रेम यांची कमतरता पडता कामा नये. ईश्वर एक आहे, त्याची नावे अगणित आहेत.

(४५)

**सादर हरिस्मरण.**

आपले पत्र वेळेवर मिळाले होते. पण समयाभावामुळे उत्तर द्यायला उशीर झाला.

पूर्वकृत पापांबद्दल पश्चात्ताप होणे अगदी योग्य आणि आवश्यक आहे, पण त्या पापांची आठवण ठेवण्यात काही फायदा नाही. जीवनात त्या पापांची पुनरावृत्ती न करणे हाच खरा पश्चात्ताप.

समर्पण भावनेने स्वत:ला देवाच्या स्वाधीन करून त्याच्या भरवशावर राहणे आणि संसारात राम न वाटणे ही फारच चांगली गोष्ट आहे. त्या परम कृपाळू ईश्वराच्या कृपेचाच हा परिणाम. जगात लोकांची साथ मिळत नाही, यात नवीन काही नाही. कारण जग हे स्वार्थपरायण आहेच. परमेश्वर नेहमी बरोबर असतो हेही अगदी खरे. याबाबतीत आपण समाधानी आहात, ही फारच चांगली गोष्ट आहे.

आपल्या प्रश्नांची क्रमवार उत्तरे अशी -

(१) आपण रामगायत्री जपाच्या रोज सहा माळा आणि ॐचा श्वास-जप करता, ते ठीक आहे. ते बदलायची आवश्यकता नाही. परंतु ब्रह्मगायत्रीचा जप करणेही उत्तम. याचबरोबर आणखी असे करा की, रामगायत्रीमध्ये ज्या देवाच्या गुणप्रभावाचे वर्णन आहे आणि ज्याचे नाव ॐ असे आहे, त्या देवाच्या स्वरूपाचे प्रेमपूर्वक स्मरणही जरूर करावे, म्हणजे मध्ये मध्ये मन इकडेतिकडे भरकटणार नाही.

(२) माळेचे मणी मोजत मुखावाटे जो सशब्द जप केला जातो,

त्याच्यापेक्षा माळेशिवाय नुसत्या श्वासाबरोबर केलेला जप फार श्रेष्ठ, आणि त्याहीपेक्षा श्रेष्ठ आहे मानसिक जप. कारण मनुस्मृतीनुसार वाणीच्या जपापेक्षा उपांशु जप दहापट आणि मानसिक जप (मानस-जप) शंभरपट श्रेष्ठ आहे. म्हणून अडाणी लोकांच्या बोलण्याकडे आपण लक्ष देऊ नये. जपाबरोबरच देवाचे निरंतर ध्यान करायला सुरुवात केल्यास फारच उत्तम. आणखी काही बदल करायचे कारण नाही. साधनामार्गावर विश्वास आणि प्रेम हवे. विश्वास व प्रेमपूर्वक केलेल्या साधनेचे महत्त्व फार मोठे आहे.

(३) परमेश्वरी प्रेरणेने ईशप्राप्तीच्या ज्या मार्गाचे अनुसरण कराल, ते त्याला प्रसन्न करण्याच्या हेतूने करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत, तो प्रसन्न आहे आणि त्याच्या कृपेने व प्रसन्नतेनेच त्याच्या प्राप्तीचा मार्ग सुलभ होत आहे, असा ठाम विश्वास असणे फारच चांगले.

(४) स्वत:ला शरीर न समजता, शरीरापासून मुक्त मानावे. सृष्टीचा संबंध शरीराशी आहे, आत्म्याशी नाही. म्हणून हे जग प्रत्यक्षात काहीही नाही, फक्त परमेश्वराची लीला आहे, असे समजणे उत्तम.

(५) बोलणारा शरीराहून भिन्न आहे, परंतु बोलण्याचे काम तो शरीराच्याच एका अवयवाद्वारे करतो. आत्मसत्तेविना वाणी आपले कार्य करू शकत नाही. जो बोलतो तोच परमेश्वर आहे, हे बरोबर आहे. तसेच तो शरीराच्या माध्यमाने बोलतो हेही बरोबर. जीवाचा सूक्ष्म शरीराशी जो संबंध आहे, तो अनादिकालापासून संचित कर्मांच्या अनुसार आहे. आपल्या कर्मानुसार जीव चांगल्यावाईट योनींत जन्माला येऊन आपल्या कर्माची फळे भोगत राहतो.

(६) तूर्यावस्था हा चिंतनाचा विषय नाही, ते साधनेचे फळ आहे. सर्व प्रकारच्या चिंतनाचा त्याग करून संकल्परहित होणे, अज्ञान समूळ नष्ट होणे आणि शरीर व इहलोक यांचा संबंध तुटणे म्हणजेच तूर्यावस्था होय. 'मी ब्रह्म आहे' अशी भावना असणे ही एक साधनेची पद्धत आहे. ही पद्धत निरहंकारी वृत्तीच्या अद्वैतमार्गीयांसाठी श्रेयस्कर आहे.

(७) 'मी शरीरापासून वेगळा आहे' - हा आपला निश्चय फारच

उत्तम आहे. अंतर्बाह्य सर्वत्र एक ब्रह्मच आहे, यात काही शंका नाही. समस्त सृष्टी परमेश्वराच्या जड आणि चेतन या दोन्ही प्रकृतींचा पसारा आहे. प्रकृती (शक्ती) ही शक्तिमानाहून (परमेश्वराहून) नेहमीच अभिन्न असते, म्हणून कार्य आणि कारण - रूपात सगळे काही ब्रह्मच आहे, असे आपण मानू शकतो, किंवा दृश्य पदार्थांचे आकलन झाल्यावर जे काही शिल्लक राहते ते ब्रह्माचे निर्गुण निराकार निर्विशेष स्वरूप आहे, असे समजावे.

(८) रागद्वेष आणि मानापमानाची भावना कमी असणे फारच चांगले; परंतु या भावना कमी आहेत म्हणून लगेच संतोष मानू नये, त्यांचा समूळ नाश व्हायला हवा.

स्वप्न हे पूर्वाभ्यासाने येते. त्याचा उपाय असा की, झोपेच्या वेळी परमेश्वराच्या लीलेचे चिंतन करीत करीत झोपी जावे, किंवा जर गीता पाठ असेल तर ती म्हणत म्हणत झोपी जावे, किंवा देवाच्या नावाचा जप आणि त्याच्या स्वरूपाचे ध्यान करीत करीत झोपी जावे. आपणास जे रुचेल आणि जे सोपे वाटेल ते करू शकता.

(९) आपली ही धारणा अगदी बरोबर आहे की, 'माझे डोळे, माझे हात, माझे पाय, माझे शरीर वगैरे' म्हणणारा जो कोणी आहे, तो शरीरापासून वेगळा आहे, तो हात-पाय किंवा शरीर नाही. कर्ता आणि भोक्ता वस्तुत: आत्मा नाही; परंतु जोपर्यंत अज्ञानवश त्याचा शरीराशी संबंध आहे, तोपर्यंत तोच कर्ता-भोक्ता आहे, असे मानले जाते. शक्ती आणि शक्तिमान यांना अभिन्न मानूनच असे म्हटले जाते की, द्रष्टा आणि दृश्य सारे काही ब्रह्म आहे. त्यांना वेगळे वेगळे मानणे म्हणजे त्या दोहोतील भेद स्वीकार करणे आहे.

(१०) शरीर, अंत:करण आणि इंद्रिये ही कर्ता-भोक्ता नाहीत, त्यांच्या द्वारे अज्ञानी जीव कर्म करतो आणि भोगतोही.

कुविचार, राग-द्वेष आदी समूळ नाहीसे होतात, होऊ शकतात. पण जोपर्यंत साधक त्यांचे अस्तित्व सहन करतो, तोपर्यंत ते जात नाहीत.

त्यांना सर्वथा वाईट समजून नाहीसे करण्याचा प्रबल प्रयत्न केल्यास ते नष्ट होऊ शकतात. आपले हे म्हणणे ठीक आहे की, रामनामाच्या प्रभावापुढे ते टिकायला नको होते, पण जोपर्यंत साधकाला स्वतःच त्यांच्या अस्तित्वाची थोडीफार इच्छा असते, तोपर्यंत ते जात नाहीत. संपूर्णपणे इच्छारहित झाल्यावरच ते समूळ नाश पावतात.

(११) जो खरोखरीच असे अनुभव करतो की, मी शरीर नाही आणि कर्ताही मी नाही, तो फलाचा भोक्ता पण नसतो; कारण सुखदु:खही शरीरच भोगते. शरीराशी संबंधच तुटल्यावर आत्मा हा सुखदु:खाचा भोक्ता मानायचे कारण नाही.

(१२) डोळे, अन्य इंद्रिये किंवा मन यांना सृष्टीच्या पसाऱ्याची जाणीव न होणे हेच जर ब्रह्मसाक्षात्काराचे लक्षण असते तर निद्रावस्थेला देखील ब्रह्मप्राप्ती म्हणता आले असते आणि त्यासाठी कोणत्याही प्रकारच्या साधनेची पण आवश्यकता नसती. परंतु असे नाही. अंत:करण आणि इंद्रिये हीही त्या पसाऱ्याचा भाग आहेत. वास्तविक सृष्टीच्या पसाऱ्याच्या तत्त्वाचे यथार्थ ज्ञान म्हणजेच अपरोक्ष ज्ञान किंवा साक्षात्कार. त्यावेळच्या स्थितीचे वर्णन करता येणे अशक्य आहे. कारण ज्या वाणीद्वारे हे वर्णन करायचे ती देखील या सृष्टीच्या पसाऱ्याचाच भाग आहे. म्हणूनच या तत्त्वाचे वर्णन करणे हा वाणी आणि मन यांचा विषय नाही, असे शास्त्रात म्हटले आहे.

(१३) बृहदारण्यक उप. ब्रा. ५ ख. ७ च्या मंत्राविषयी आपण जे विचारले आहे त्यात त्या परब्रह्म परमात्म्यालाच आत्मा म्हणून त्याचे वर्णन दिले आहे. इथे परमात्म्यास आत्मा असे अभेद-दृष्टीने म्हटले गेले आहे. शारीरिक अवस्थेनुसार अंत:करण आणि इंद्रियांच्या शक्तींचा ऱ्हास होणे स्वाभाविक आहे. परंतु ईशस्मरणासाठी, ज्या अवस्थेत जेवढी शक्ती असते तेवढी पुरी असते. देवकृपेने जे काही मिळाले आहे, त्याचा उपयोग देवाच्याच आज्ञेने, त्याच्या इच्छेप्रमाणे, त्यालाच प्रसन्न करण्याच्या हेतूने करावा. आपण या अवस्थेत देखील पहाटे साडेचार वाजता उठून, स्नान करून नित्यकर्म पूजापाठ वगैरे करता, हे फारच उत्तम.

४६

**प्रेमपूर्वक हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. आपल्या प्रश्नांची क्रमवार उत्तरे अशी -

(१) स्वत:चा वर्ण कोणता हे ठरविण्यासाठी आपण आपल्या समजुतीनुसार जो प्रयोग केला, ती काही शास्त्रीय पद्धती नाही, केवळ आपली धारणा आहे. स्वत:च्या धारणेविषयी सर्वांना स्वातंत्र्य आहे. त्याविषयी मी काय बोलू ? माझे तर असे मत आहे की, ईशप्राप्तीचा जितका अधिकार आणि स्वातंत्र्य एका उच्चतम वर्णाच्या किंवा जातीच्या माणसास आहे तितकाच नीचतम वर्णाच्या किंवा जातीच्या मनुष्यास आहे. मग साधकाने कुठल्याही वर्णाचा किंवा जातीचा अभिमान बाळगून काय फायदा ? तो ज्या परिस्थितीत आहे आणि जसा आहे, त्यातच त्याने साधनामार्गी लागले पाहिजे. लोक जर त्याला द्विज मानत असतील तर त्याने द्विजोचित व्यवहार करावा आणि शूद्र मानत असतील तर शूद्रोचित आचरण करावे. दुसऱ्याच्या हितास बाधक होईल असे कोणतेही काम करता कामा नये. त्यालाच साधना असे म्हणतात. मी आपणास द्विजोचित आचरण करायची मनाई का केली होती, ते मला आठवत नाही. जर आपणास किंवा आपल्या परिवारजनांना द्विज असण्याबद्दलची खात्री नसेल तर द्विजोचित शास्त्रकर्मे आपण कशी कराल ? आणि जर कुणाला शंका नसेल, सगळेच आपणास खुषीने द्विज मानत असतील तर मग आपण द्विजोचित कर्म का करू नये ? म्हणून नीट मागचा पुढचा विचार करून जे योग्य असेल, तसे करावे. या बाबतीत आपापसात भांडणे होता कामा नयेत. जे काम करायचे ते प्रेम व शांतिपूर्वक करावे. मला तरी असेच योग्य वाटते. द्विज असण्यानसण्याबद्दल शंका असेल तर निम्नवर्ण स्वीकारण्यात कल्याणेच्छू माणसाचा जास्त फायदा आहे. उच्च मानण्यात नुकसान आहे. नीच मानण्यात फायदा असा की त्यात उच्चवर्णीय असण्याचा अहंकार येत नाही.

(२) पुत्राचे सगळे संस्कार होतात, परंतु कन्येचे सगळे होत नाहीत.

जन्मापूर्वी मुलगा होणार किंवा मुलगी होणार हे समजत नाही. म्हणून जात-कर्मापर्यंतचे संस्कार सगळ्यांचेच होऊ शकतात. शेवटी विवाह आणि अंत्यसंस्कार पण सगळ्यांचे होतात. परंतु उपनयन, वेदाध्ययन, गुरूकुलवास इत्यादि संस्कार कन्येचे होत नाहीत. 'संस्कार-भास्कर' किंवा 'गृह्यसूत्र' या पुस्तकात या विषयी विस्तृत विवरण आहे, ते आपण पाहू शकता. तसेच या विषयातील जाणकार विद्वानांनाहि विचारू शकता. नाळ कापणे हे जातकर्माच्या अंतर्गत येते. जो काही बदल करायचा असेल तो घरच्या लोकांच्या संमतीने आणि खुषीने करावा. पारंपरिक रीतिरिवाज तोडून घरात विरोध वाढविणे शहाणपणाचे नाही. साधकाचे यात नुकसान आहे. धर्मपालनात लाज किंवा संकोच वाटता कामा नये. उलटपक्षी रागद्वेष वाढविणारे काम म्हणजे धर्म नव्हे, हेही लक्षात ठेवावे.

(३) मुक्ती प्राप्त झालेल्या माणसाचे बांधव, मातापिता वगैरे सर्वांचा उद्धार होतोच असे नाही. असे झाले तर एकानंतर एक एक करत अनेकांची मुक्ती व्हायची पाळी येईल. कारण एका मुक्त मनुष्याचे मातापिता, भाऊ आणि पत्नी मुक्त झाल्यावर पुढे त्या सर्वांचेही मातापिता आणि नातेवाईक मुक्त होतील. नंतर त्यांचे मातापिता वगैरे, मग त्यांचे..... असे अनंतापर्यंत चालत राहील आणि सगळीच अव्यवस्था माजेल. म्हणून ही गोष्ट साधकाने परमेश्वरावरच सोडावी. त्याला जे योग्य वाटते ते तो करतो आणि करणार.

(४) परमेश्वर सर्वांचा गुरू आहे. योगदर्शनात परमेश्वराकडे निर्देश करून स्पष्टच म्हटले आहे की, '(स) **पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात्**' (योग. १.२६). म्हणून त्याला गुरू मानणे हे सर्वात उत्तम आहेच. त्याशिवाय गुरुप्राप्तीसाठी परमेश्वराची प्रार्थना करण्यात पण काही नुकसान नाही. परंतु जे लोक म्हणतात की, गुरुविना भजन व नामजपाचा काही उपयोग नाही, त्यांचे तसे म्हणणे बरोबर नाही. माझ्या मते त्यांच्याकडे दुर्लक्ष करावे. तसे पाहिले तर ज्या ग्रंथाच्या किंवा व्यक्तीच्या सोबतीमुळे साधक साधनामार्गी लागतो, त्यालाच गुरू समजले तरी चालेल. या दृष्टीने पाहिले तर कुठलाच साधक गुरूशिवाय नाही. श्रीदत्तात्रेयांनी याच दृष्टीने

चोवीस गुरू केले होते. खरे तर देवाच्या कृपेने प्राप्त झालेला आपला विवेक हाच सर्वात मोठा गुरू. जो त्याचा आदर बाळगतो, तोच गुरूचा आदर करतो आणि त्याचा आदर न करणारा गुरुकृपेसही वंचित होतो. संत तुलसीदासांनी असेही म्हटले आहे की, **'मुरूख हृदयँ न चेत जौं गुरु मिलहि बिरंचि सम ॥'** या उक्तीवर विचार करावा.

त्यांनी गुरुविना ज्ञान आणि मुक्ती न मिळण्याबद्दल जे म्हटले आहे, त्याचा भाव असा आहे की, एखाद्या साधकाची जी काही प्रगती झाली असेल किंवा त्याला जे ज्ञान प्राप्त झाले असेल, ते कुणाना कुणाच्या सत्संगामुळे प्राप्त झाले आहे आणि ज्याच्या संगतीमुळे त्याची ईशप्राप्तीच्या मार्गात प्रगती झाली तोच त्याचा गुरू.

(५) आपल्या विवेकबुद्धीच्या अनुसार आचरण करण्याचा अर्थ असा की, जो विवेक वापरून आपण दुसऱ्यांचे दोष पाहतो, त्याच विवेकाच्या मदतीने आपले स्वत:चे दोष टिपून त्यांची पुनरावृत्ती न करण्याचा दृढ संकल्प करणे. दुसऱ्यांकडून आपण ज्या वागणुकीची अपेक्षा करीत नाही, किंवा जी वागणूक आपल्या दृष्टीने वाईट आहे, तशी वागणूक आपण दुसऱ्याशी करू नये. दुसऱ्या शब्दात, ज्या वागणुकीची आपण दुसऱ्याकडून अपेक्षा करतो किंवा जे वागणे आपण चांगले समजतो, तसेच आपण दुसऱ्याशी वागावे. आपल्या गुणांचा अहंकार बाळगू नये आणि आपले दोष लपवू नयेत. दुसऱ्याने आपल्याशी गैरव्यवहार केला तरी त्याचा तो अपराध मानू नये व त्याच्यावर रागावू नये, उलट त्याला मोकळ्या मनाने क्षमा करावी. तसेच आपल्याकडून कुणाशी गैरव्यवहार झाला, तर ताबडतोब त्याची क्षमा मागावी आणि पुन: तशी चूक करू नये. अशा प्रकारे आपल्या ज्ञानाचा आदर करून मनुष्य स्वत:मध्ये खूपच सुधारणा घडवून आणू शकतो.

(६) ॐ कारात अनुस्वाराचा उच्चार मकारातच झाला पाहिजे. म्हणूनच खूप लोक 'ओम्' असेही लिहितात. देवी सरस्वती जर लौकिक विद्यांची अधिष्ठात्री मानली तर त्यात चुकीचे असे काही नाही. फक्त भावना निष्काम हवी.

(७) मुक्त झालेल्या मनुष्यामध्ये कोणत्याही प्रकारची इच्छा शिल्लक राहात नाही. त्याचे समग्र आचरण ईश्वरी प्रेरणेच्या अनुसार लोकहितार्थ होते, मग ईश्वर त्याला राजा करो, राजाचा प्रतिनिधी (राजाज्ञेचा अंमल बजावणारा) करो किंवा काहीच न करो. म्हणून तो आपल्या इच्छेने अमुक काम करू शकतो किंवा नाही असा प्रश्नच उद्‌भवत नाही. जोपर्यंत कुठल्याही प्रकारची इच्छा शिल्लक आहे, तोपर्यंत मुक्ती मिळेलच कशी ? या इच्छारूपी पाशातच प्राणिमात्र जखडून पडला आहे.

वेगवेगळ्या पुण्यकर्मांच्या फलस्वरूप अनेक प्रकारचे अधिकार प्राप्त होतात, त्याचा मुक्तीशी काही संबंध नाही.

(८) आजारी माणसाने देखील असे समजावे की, तो आजारी नाही. असे मानण्यामुळे त्याचा रोग नाहीसा होईल असे नाही, पण त्या रोगामुळे होणारे दु:ख त याला जाणवणार नाही. जर दु:ख होत राहिले आणि तोंडाने मात्र तो 'मला काही व्याधी नाही' असे म्हणत राहिला तरी तो स्वत:ला आजारीच समजतो. परमेश्वरी विधान हे मनुष्याच्या कर्मानुसार असते. ते कल्याणकारक आहे, असे मानून जो देवावर भरवसा ठेवतो, तो ईशप्राप्तीच्या मार्गात प्रगती करतो. जो देवाला शिव्या देतो, तो दु:खी होतो आणि परमेश्वरापासून दूर जातो.

(९) संध्येमध्ये अगदी थोडे प्राणायाम करावे असा नियम आहे, त्यासाठी विशेष ज्ञानाची आवश्यकता नाही. परंतु समग्र आसन व प्राणायामाचा अभ्यास करायचा असेल तर एखाद्या अनुभवी योगशिक्षकाकडून विधिवत शिक्षण घेऊनच तो करावा, अन्यथा दुष्परिणामाची भीती असते.

(१०) द्विज असूनही जर संध्या, होम इत्यादी नित्यकर्मे केली नाहीत तर नित्यकर्म-त्यागाचा अपराध तर होईलच, पण त्याचे निराकरण होणार नाही असे मात्र नाही. केवळ देवाच्या नामाचा श्रद्धा-भक्ति-प्रेमपूर्वक जप केल्यानेदेखील मनुष्यास मुक्ती मिळू शकते.

(११) पितृपक्षात पूर्वजांच्या निमित्ताने ब्राह्मणभोजन घातल्याने श्राद्धकर्त्याचे पूर्वज निश्चितच तृप्त होतात. ते जिथे, ज्या योनीत असतील, तिथेच ते पुण्यकर्म त्यांच्या बाकी पुण्यात जोडले जाऊन, परमेश्वरी

विधानानुसार त्याचे फळ अवश्य मिळते. ते फळ त्यांना कोणत्या रूपात आणि कसे प्राप्त होते, ते त्यांच्या निमित्ताने ब्राह्मणभोजनादी शुभकर्मे करणाऱ्याच्या संकल्पावर आणि कर्मांचे फळ देणाऱ्या प्रत्यक्ष परमेश्वरावर अवलंबून असते. हे एका विशिष्ट प्रकारानेच होत असते तर त्याचा उल्लेख करता आला असता. पितरांना जे अर्घ्य वगैरे दिले जाते, ते शास्त्रोक्त प्रकारे द्यावे. मंत्र पण शास्त्रोक्त असावेत. हे शास्त्रकर्म द्विजांच्यासाठी आहे. शूद्रांनी मंत्राशिवाय परंतु श्रद्धा-भावनायुक्त अंत:करणाने हे करावे. मंत्रपूर्वक अर्घ्यदानाचा त्यांना अधिकार नाही.

(१२) एकूण सात लोक मानले गेले आहेत. ज्यात आपल्याला सूर्य चंद्र, नक्षत्रे वगैरे दिसतात तो सगळा स्वर्गलोक. सर्व देवांचा अधिपती इंद्र. जशी एखाद्या राजाच्या मांडलिक राजांची आपापली राज्ये, जहागिरी, गड वगैरे असतात, तशी सूर्यलोक, चंद्रलोक वगैरे अन्य देवांची स्थाने.

(१३) आपल्या पुण्याईने देवत्व प्राप्त करणारा प्राणी स्वत:च्या योग्यतेनुसार वर लिहिलेल्या लोकात (सूर्यलोक, चंद्रलोक वगैरे) जातो.

(१४) 'समुद्राचे पाणी खारट का ?' याची जी चर्चा लंकाकांडात आहे, तो विनोद आहे, तात्त्विक वर्णन नाही. आधुनिक वैज्ञानिक त्याचे काय कारण मानतात, हे मला माहीत नाही. मी स्वत: ते जाणून घ्यायचा कधी प्रयत्नही केला नाही. एका साधकाला अशा (अनावश्यक) गोष्टी जाणून घ्यायचे काही कारण नाही.

(१५) चंद्रासंबंधीचे लंकाकांडातील वर्णनही विनोदात्मक आहे. ते तात्त्विक विवेचन नाही. त्याचा अधिष्ठाता देव चैतन्ययुक्त आहे. दिसणारा लोक सचेतन नाही. त्यात दोन्ही वर्णने आहेत. तिथे काय आहे, काय नाही यासंबंधी वेगवेगळ्या प्रकारे अंदाज लावता येतील. शास्त्रांनुसार ते एका प्रकारच्या देवतांचे निवासस्थान मानले गेले आहे. त्यात जो प्रकाश आहे, तो सूर्याचा प्रकाश आहे असे मानले जाते.

(१६) शूद्र वर्णात फक्त दोनच नाहीत, अनेक वर्ग आहेत. ते वर्ग त्यांच्या पारंपरिक आचार, व्यवहार आणि व्यवसायानुसार आहेत. सत्-

शूद्रांच्या हातचे पाणी आणि त्यांच्या भांड्यांचा वापर हे दोन्हीही गैर नाही, पण उष्ट्या भांड्यांचा वापर घासून स्वच्छ धुऊन मगच करावा.

(१७) जपाची माळ ओढताना हात वस्त्राच्छादित करण्याची जी प्रथा आहे, त्यामागची भावना, जप गुप्त ठेवावा अशी असावी, असे मला वाटते. परंतु आजकाल याचा उलटाच अर्थ लावला जातो. माझ्या मते, जो मनुष्य माळेशिवाय मनोमन जप करतो तो अधिक श्रेष्ठ आहे. म्हणून हात झाकण्याला मी प्राधान्य देत नाही. मनात विशिष्ट इच्छा ठेवून केलेल्या मंत्र-जपाबद्दल असा नियम असू शकेल, पण निष्काम जपात याला महत्त्व नाही. कारण निरिच्छ माणूस फळाची अपेक्षाच करीत नाही.

(१८) आपली स्वत:ची इच्छा नसली तरी, घरच्या लोकांच्या समाधानासाठी आणि खुषीसाठी रोग्याने औषधपाणी आणि पथ्य वगैरे केलेच पाहिजे. परमेश्वराची तशी आज्ञा आणि प्रेरणा आहे. कोणत्याही परिस्थितीत माणसाने कामचोर आणि आळशी बनू नये. केवळ फळाच्या बाबतीत परमेश्वरावर भरवसा ठेवावा. प्रयत्न करूनही जर आजारपण संपले नाही तर परमेश्वराची अशीच इच्छा आहे, असे समजावे. म्हणून या बाबतीत घरच्या लोकांना विरोध करणे योग्य नाही.

(१९) परमेश्वरी निर्णयावर पूर्ण विश्वास नसणे, यामागे परमेश्वराच्या श्रेष्ठतेबद्दलचे अज्ञान हे कारण असू शकेल. आपला पूर्ण विश्वास केव्हा बसेल, हे मी कसे सांगू ? जेव्हा आपण विश्वास ठेवाल तेव्हाच तो बसेल. विश्वास ठेवणे हे तुमच्याच हातात आहे.

(२०) 'परमेश्वराची शरणागती पत्करणे' या विषयावर आपणास सविस्तर माहिती हवी असेल तर आपण **'तत्त्वचिंतामणि'** मधील या विषयावरचा लेख वाचावा. पत्रात फार सविस्तर लिहिणे कठीण आहे.

(२१) परमेश्वराच्या प्राप्तीसाठी जपसंख्या पण नक्की ठरलेली नाही आणि किती दिवस लागतील हेही सांगता येणार नाही. जेव्हा मनुष्याचा परमेश्वरावर सप्रेम विश्वास बसतो, जेव्हा तो पूर्णपणे निरिच्छ होऊन केवळ त्याच्या भेटीची आस ठेवतो, त्याच्या दर्शनासाठी बेचैन होतो, तेव्हाच परमेश्वर त्याला भेटतो असा माझा विश्वास आहे. 'उत्कट

इच्छेचा अभाव' या एकाच कारणाने ईश्वरी साक्षात्कारास विलंब होऊ शकतो. जोपर्यंत मनात तऱ्हेतऱ्हेच्या इच्छा घर करून बसलेल्या असतात, तोपर्यंत देव भेटत नाही. निष्काम मनुष्यास देवाची भेट होण्यासाठी एक दिवससुद्धा लागता कामा नये, मग वर्षांची गोष्टच कशाला ?

## ४७

**सादर हरिस्मरण.**

आपली दोन्ही पोस्टकार्डे वेळेवर मिळाली होती. समयाभावामुळे उत्तरास उशीर झाला. आपल्या प्रश्नांची उत्तरे खालीलप्रमाणे.

आपण लिहिता की, आजकाल लोकांनी चांगली कामे करणे सोडून दिले आहे. कुणाला म्हटलेच तर भांडायला उठतो. ठीक आहे. पण भांडण करून काही फायदा नाही. जे लोक स्वत:ला शिवरूप समजतात, ते भ्रमात आहेत. हा सारा कलियुगाचा महिमा आहे. जे लोक गुरुपणाचा डंका पिटतात आणि देवाच्या जागी स्वत:च्या नश्वर शरीराची पूजा करून घेतात, ते वास्तविकपणे महात्मा पण नाहीत आणि संतही नाहीत. त्यांना लबाड-लुच्चे समजले पाहिजे. भोळ्याभाबड्या लोकांनी या ठकांच्या जाळ्यात सापडू नये. जे असे म्हणतात की, पापपुण्य करणे हा प्रकृतीचा नियम आहे, त्यांना विचारले पाहिजे की, जेवणे आणि कपडे घालणे हा कुणाचा धर्म आहे ? जर कुणाच्या डोक्यावर टोला मारला तर तो मार कुणाला लागेल ? आत्म्याला तर मार बसू शकत नाही, मानापमानही आत्म्याचा होत नाही, मग राग कुणाला येतो आणि का येतो ? जे लोक **'शिवोऽहम्'**, **'सोऽहम्'** चा जप करायचा सल्ला देतात, तो जप तर चांगला आहे. पण जपही निसर्गाने निर्माण केलेल्या इंद्रियांच्या द्वारेच होणार ना ? त्याचा आत्म्याशी काय संबंध ?

ज्ञानासारखे पावित्र्यकारक दुसरे काही नाही, हे अगदी बरोबर. परंतु ते ज्ञान कोणते याची समज त्यांना आहे का ? त्यांनी ज्यांना हा उपदेश दिला आहे त्यांना तरी समजले आहे का ?

त्यांना विचारले पाहिजे की, अज्ञानात कोण आहे आणि ज्ञानाची प्राप्ती कुणाला होते ? ज्ञान आणि अज्ञान प्रकृतिस्थ आहे का ते अंत:करण अथवा आत्म्याच्या ठायी वास करते ?

ते म्हणतात की, भक्ती बंधनात टाकते, मग त्यांना असे विचारले पाहिजे की, गीतेत भक्ती ही मुक्तिकारक आहे, असे का सांगितले आहे ?

ते गुरूची पूजा, आरती आणि ध्यान करायला सांगतात, पण गुरू आणि शिष्य दोघांचा आत्मा तर एकच आहे. नश्वर शरीर ही प्रकृतीची रचना आहे, मग ध्यान, पूजा आणि आरती कोण करणार आणि कुणाची करणार ? जर शिष्य स्वत:च ब्रह्म आहे तर गुरू काय आहे ? जर जडाची मूर्तिपूजा होते तर गुरूचे शरीरदेखील जडच आहे. तोही हाडामांसाचा पुतळा आहे. त्यात मलमूत्रही भरलेले आहे. मग तो शुद्ध आणि चैतन्यरूप कसा म्हणता येईल. शुद्ध, चैतन्यरूप फक्त आत्मा आहे. त्याची पूजाही होत नाही आणि ध्यानही करता येत नाही. शिवाय तो पूज्य आणि पूजक दोघातही सारखाच आहे.

जे लोक मूर्तीला जड आणि शरीराला चैतन्यरूप मानतात, ते बाकी लोकांची फसवणूक करतात. जो पापपुण्य करतो तोच त्याचे फळ भोगतो. दांभिक लोकांनी आपापल्या पापाची काळजी घेतली तरी पुरे. दुसऱ्यांचे पाप नाश करायची शक्ती त्यांच्यात नाही. स्वत:चे पाप नष्ट करणेही त्यांना शक्य नाही.

जे लोक शिष्य गोळा करण्यासाठी असे प्रतिपादन करतात की, 'तुम्ही आपली पापपुण्ये आम्हांस अर्पण करा, आम्ही आपल्या सामर्थ्याने त्यांचा परिहार करू', ते अहंकाराच्या डोहात बुडले आहेत. त्यांना असे म्हणावे की, 'तुम्ही प्रथम आपल्या पापपुण्यातून निवृत्त व्हा आणि काय हो, स्वत:ला 'आम्ही' म्हणणारे तुम्ही कोण?' त्यांच्याकडून याचे उत्तर मिळणार नाही.

आपण लिहिले आहे की, सनातन धर्म बुडून गेला आहे. विश्वास बाळगा की, सनातन धर्म कधी नष्ट होत नाही. नष्ट होणारा धर्म सनातन

धर्म नव्हेच. ज्याचा आदि-अंत नसतो त्यालाच सनातन म्हणतात. तो नेहमीच होता आणि पुढेही नेहमी राहील. धर्माच्या मर्यादेचे रक्षण करायला परमेश्वर आहे. आमचे सामर्थ्य ते काय ?

जे म्हणतात की, आपण म्हणजे शरीर नव्हे. त्यांना विचारले पाहिजे की, 'तुम्ही कोण ? वाईट कामे कोण करते ? गुरूला अर्पण कोण करते? गुरू म्हणजे काय ?' शुद्ध सच्चिदानंद कर्मही करीत नाही आणि बोलतही नाही. त्याला सुख:दुख पण होत नाही.

हे पाखंडी लोक विषयभोगासाठी शरीर होतात आणि बोलण्यापुरते शुद्ध सच्चिदानंद होतात, पण ही चलाखी यमराजासमोर चालायची नाही. कर्माचे फळ कर्त्याला भोगायलाच लागणार.

## ४८

महोदय.

सादर हरिस्मरण. आपले पत्र वेळेवर मिळाले होते. समयाभावामुळे बऱ्याच वेळा उत्तरास उशीर होतो. आपल्या गीताविषयक शंकांची क्रमवार उत्तरे खालीलप्रमाणे.

(१) गीतेच्या अकराव्या अध्यायातील ४७ व्या श्लोकात भगवंतांनी अर्जुनास म्हटले आहे की, माझे हे रूप, यापूर्वी तुझ्याशिवाय कोणीही पाहिले नाही. हे सर्वथा बरोबर आहे. याचे उत्तर 'गीतातत्वविवेचनी' मध्ये स्पष्ट दिलेले आहे. काक-भुशुण्डी यांना भगवंतांनी जे विराटरूप दाखविले होते, ते याहून अगदी विलक्षण होते. त्यात कौरव नव्हते, पांडवांचे सैन्य नव्हते किंवा भीष्मद्रोणादी महारथीही वीरगतीस प्राप्त होताना दिसत नव्हते. दुसरे म्हणजे अर्जुनास जे रूप देवाने दाखविले होते, त्यात अनेक ब्रह्मांडे नव्हती, फक्त त्यावेळचे एक ब्रह्मांड दाखविले होते. म्हणूनच भगवंतांनी बरोबरच म्हटले आहे की, हे रूप यापूर्वी दुसऱ्या कुणी पाहिले नाही.

(२) भगवंतांनी उत्तङ्क ऋषींना जे विराट रूप दाखविले, ते त्यांच्यावर अनुकंपा म्हणून दाखविले. साधनेच्या फलस्वरूप नव्हे. म्हणून उक्त

मार्गांनी केलेल्या साधनेच्या फलस्वरूप भगवंताच्या रूपाचा साक्षात्कार होणे शक्य नाही, या कथनात काही विसंगती नाही. परमेश्वर आपल्या भक्तास आपले तत्त्व आणि महत्त्व समजावून देण्यासाठी सगळे काही दाखवू शकतो. (गीता ११.५४).

(३) शुक्लमार्गी प्रयाण करणाऱ्याने जर दक्षिणायनात शरीर सोडले तर उत्तरायण सुरू होईपर्यंत त्याला मार्गामध्ये शुक्लपक्षाच्या अधिष्ठात्याच्या सत्तेत राहायला लागते. पितामह भीष्मांचे मृत्यूवर नियंत्रण होते, म्हणून त्यांनी उत्तरायणकालाची वाट पाहणे योग्यच होते.

(४) आत्महत्या हे प्रारब्धाचे फळ नाही. ते एक नवे पापकर्म आहे. म्हणून ते चित्रगुप्त किंवा विधाता यांचे पूर्वलिखित नसते. विधाता फक्त पूर्वकृत कर्माच्या फलाचे विधान करतो. नवीन पापपुण्यकारक कर्मांचे स्वातंत्र्य मनुष्यास दिलेले आहे, त्या कर्मांच्या फलाचे विधान त्या त्या वेळी होत राहाते. अल्पायुषी किंवा दीर्घायुषी असणे हे पूर्वकृत कर्मांचे फळ आहे आणि ते आपोआप मिळते. आत्महत्या त्यात मोडत नाही. जाणूनबुजून मृत्यूला दिलेले आमंत्रण हे नवे कर्म आहे. पूर्वकृत कर्मांचे फळ नाही. म्हणून यात विसंगती नाही. आपण दिलेले उदाहरण याच्याशीच संबंधित आहे.

आपण ज्या मंत्राचा उल्लेख केला आहे, त्यात '**आत्महनो जनाः**' असे जे पद आले आहे, त्याचा अभिप्रेत अर्थ आपल्या शरीराची हत्या करणारे, असा नाही. परंतु जे प्राणी मनुष्यजन्मात येऊनदेखील आपला उद्धार करून घेत नाहीत आणि पुन:पुन: जन्ममृत्यूच्या फेऱ्यात अडकतात, त्यांच्याबद्दल हे उद्‌गार आहेत. वस्तुत: तेही एक प्रकारे आत्महत्त्याच करतात.

(५) दातवण करण्यासाठी झाडाची ढापी तोडायला लागते, त्या हिंसेतून बचाव व्हावा म्हणून उपवासादिवशी दातवणाची मनाई आहे, दात धुण्यावर प्रतिबंध नाही. दात अन्य प्रकारे देखील स्वच्छ करता येतात. त्यात काही अडचण नाही.

४९

महोदय,

प्रेमपूर्वक हरिस्मरण. आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. आपल्या शंका आणि प्रश्नांचे क्रमवार समाधान याप्रमाणे-

(१) श्रीराम, श्रीकृष्ण आणि श्रीविष्णू हे तीन नाहीत. एकाच परब्रह्म परमेश्वराची ही तीन नावे आणि रूपे आहेत. उपासकांच्या आवडीप्रमाणे वेळोवेळी परमेश्वर नाना रूपात प्रकट होतो. म्हणून साधकास जे नाव रूप गोड वाटेल, आवडेल, ज्यावर त्याची श्रद्धा व प्रेम असेल आणि ज्याचे ध्यान-जप त्याला सोपे व सोईस्कर वाटेल, तेच त्याने घ्यावे.

ज्या महापुरुषाने ज्या नावारूपाच्या आधारे साधनेत सफलता मिळविली, त्याचेच माहात्म्य त्याने आपल्या शक्ति-बुद्धीनुसार प्रतिपादले. वास्तविकत: कोणी लहान नाही आणि कोणी मोठा नाही. परमेश्वराच्या सगळ्या नावारूपांचे आणि मंत्रांचे सामर्थ्य अपार आहे. त्यांचे माहात्म्य जेवढे गावे तेवढे थोडे आहे.

म्हणून माझे मत असे आहे की, आपणास जर रामषडक्षर मंत्राचा जप अधिक सुगम वाटत असेल आणि आवडतही असेल, तर आपण त्याचाच जप करावा.

ज्या साधनामार्गात साधकाची श्रद्धा आणि प्रेम यांचे ऐक्य होते, तोच मार्ग श्रेयस्कर.

(२) **'ॐ नमो नारायणाय'** चा अर्थ आहे - त्या सत्-चित् आनंदस्वरूप भगवान् नारायणास माझा नमस्कार असो. तसेच **'रां रामाय नम:'** चा अर्थ आहे - त्या सत्-चित्-आनंदस्वरूप भगवान रामास माझा नमस्कार असो. अशा प्रकारे या दोन्ही मंत्रांचा अर्थ निराकार-पर आहे.

(३) स्वाभाविकत: येणाऱ्या जाणाऱ्या श्वासाबरोबर केल्या जाणाऱ्या जपाला श्वास-जप असे म्हणतात आणि श्वासाचा कंठास जो स्पर्श होतो, त्या अनुभूतीबरोबर होणाऱ्या जपाला कंठ-जप असे म्हणतात. पण तसे एकच, कारण दोन्ही श्वासाच्या लयीबरोबर होतात.

(४) जप हा श्वासाबरोबर करा किंवा जिह्वेच्याद्वारे करा, त्याची संख्या मोजणे न मोजणे हे साधकाच्या इच्छेवर अवलंबून आहे. त्याने तो माळा मोजून करावा किंवा न मोजता करावा, त्यात उत्तम-मध्यम असा फरक नाही. ज्यात मन रमेल आणि जो निष्काम भावाने, श्रद्धा-प्रेमयुक्त अंत:करणाने केला जाईल तो उत्तम. जप मोजून केल्यास संख्येने भरपूर होतो, म्हणून तो मोजून केला जातो. परंतु न मोजता केला म्हणून काही बिघडत नाही.

(५) कोणासाठी कोणता साधनामार्ग श्रेयस्कर होईल हे साधकाच्या स्वभाव, विश्वास आणि प्रेम यावर अवलंबून आहे. म्हणून यासंबंधीचा निर्णय आपण स्वत:च घ्यावा. निर्णय कोणत्या आधारावर करायचा, हे वर पहिल्या प्रश्नाच्या उत्तरात लिहिलेच आहे. तसेच मी माझ्या सहमतीबद्दलही लिहिले आहे. माझ्या मते श्रीराम, श्रीकृष्ण व श्रीविष्णू यात काही फरक नाही. माझ्या लेखांवरून व व्याख्यानांवरून मी श्रीरामनाम व रामरूप यांची उपासना केली आहे, असे जे आपणास वाटते, ते आपली रुचि आणि धारणा यांमुळे.

(६) वेष आणि साधनामार्ग यांचा काही खास संबंध नाही. म्हणून, साधनेप्रीत्यर्थ वेष बदलण्याचे कारण नाही. आपण तिसरा विवाह न करण्याची आणि मंदिरात एकांतवासात राहण्याची जी इच्छा प्रकट केलीत, ती योग्यच आहे. त्याने साधनेत मदत मिळू शकेल. संसाराच्या पाशातून मुक्त राहाणे केव्हाही चांगलेच, पण हा त्याग केवळ वरकरणी नसावा; आंतरिक आसक्तीचाही परित्याग केला पाहिजे. वरवर त्यागाने काम चालणार नाही.

## ५०

**प्रेमपूर्वक हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. आपण लिहिले आहे की, 'ईश्वर अजन्मा व अविनाशी आहे, या धारणेबद्दल मी साशंक आहे'. पण ईश्वराचे अस्तित्व जर आपणास मान्य असेल तर त्याला अजन्मा आणि अविनाशी मानणे आपणास भाग पडेल. कारण त्याचा जन्म झाला

असे मानले, तर ज्याने त्याला जन्म दिला त्याला काय म्हणाल ? आणि त्याच्या जन्मदात्यास, त्या जन्मदात्याच्या जन्मदात्यास काय म्हणाल ? जिथे हे थांबेल त्या शेवटच्यास तरी ईश्वर मानायलाच लागेल. त्याचप्रमाणे जर ईश्वराचा विनाश मानला तर त्याच्या विनाशानंतर कुणाची सत्ता मानाल ?

आपण लिहिता की, 'एखादी शक्ती अजन्मा आणि अविनाशी आहे असे मानणे माझ्या विश्वासात बसत नाही.' तर मग आपण स्वत: असा विचार करावा की, 'मी कोण आहे ? मी शरीर आहे ?' विचारांती हे मानणे भाग पडेल की, आपण म्हणजे शरीर असणे शक्यच नाही. कारण शरीर वारंवार बदलत राहाते, परंतु आपण बदलत नाही. दहा वर्षांपूर्वी जे शरीर होते, तसे ते आज नाही; इतकेच काय, त्यापूर्वीचे शरीर पण आपल्याला आठवते. आपण शरीराला ओळखतो, पण शरीर आपल्याला ओळखत नाही. शरीराचा एखादा अवयव, हात-पाय कापला गेला तरी आपण कापले जात नाही, तद्वत्, शरीराचा नाश झाल्यावर आपला नाश होत नाही; आपल्याला दुसरे शरीर मिळते. यावरून हे सिद्ध होते की, जन्म आणि नाश आपला होत नाही, शरीराचा होतो. जर आपण स्वत: चैतन्ययुक्त ईश्वराचा अंश आणि त्याच्याच जातीचे असल्यामुळे अजन्मा आणि अविनाशी आहात, तर मग तो ईश्वर अजन्मा आणि अविनाशी आहे, यावर आपला विश्वास का बसत नाही ?

आपण असाही विचार करा की, सगळी माणसे सारखी नसतात. त्यांची सुखदु:खे, ती भोगण्याची कारणे आणि शक्तीदेखील एकसारखी नसते. याचे कारण काय ? जर 'पूर्वजन्मीची कर्मे' असे म्हटले तर हे मानणे भाग आहे की, जन्म आणि मृत्यू हे शरीराचे धर्म आहेत, आपले नाहीत. जर पूर्वजन्म मानला नाही तर मग विरोधाभासाचे कारण शोधायला लागेल.

असा विचार केल्यावर आपणास हे पटेल की, ईश्वर अजन्मा आणि अविनाशी आहे.

## ५१

**प्रेमपूर्वक हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले, मजकूर समजला. पूर्वी आपली खूप पत्रे येत असत. आपण प्रत्यक्षही भेटला आहात.

आध्यात्मिक मार्गात निराश होता कामा नये. परमेश्वराच्या मदतीने तत्परतेने साधना करीत राहिल्यास प्रगती होईलच.

कुणाला मोहाच्या दलदलीतून बाहेर काढणे माझ्या सामर्थ्याबाहेरचे काम आहे. मी फार तर माझ्या बुद्धीनुसार योग्य वाटणारा सल्ला देऊ शकतो.

मृत्यूचा काय भरवसा ? या शरीराचा (आयुष्याचा) जन्मापासून ऱ्हास होत आहे. मरणाची चिंता न करता, जोपर्यंत प्राण आहे तोपर्यंत साधनेत लीन राहिले, तरच मनुष्यजन्म सफल होईल.

आपल्या प्रश्नांची उत्तरे अशी -

(१) नामजपाबरोबर स्मरण आपोआपच होत राहिले पाहिजे, ते सोडायचा प्रश्नच उद्भवत नाही. रोमांच, अश्रुपात आणि गहिवरून येणे हे तर प्रेमाचे प्रकटीकरण आहे. अशा अवस्थेत स्मरण आपोआपच होते. नामजप सोडता कामा नये, एखादे वेळी चुकून राहिले तर गोष्ट वेगळी.

(२) भगवान राम, कृष्ण आणि विष्णू एकाच ईश्वराची नावे आणि रूपे आहेत. त्यांच्यात काही फरक नाही. म्हणून आपण राम-राम ऐवजी हरे-राम मंत्राचा जप आणि श्रीकृष्णाचे ध्यान केले तरी त्यात काही चुकीचे नाही; साधकाची आवड, विश्वास आणि योग्यतेप्रमाणे जो साधनामार्ग सुगम वाटेल तोच त्याच्यासाठी चांगला. गुरूने दिलेल्या मंत्राची नियमाने एक माळ ओढून नंतर दिवसभर दुसऱ्या मंत्राचा जप केला तरी त्यात दोषपूर्ण असे काही नाही आणि भिण्यासारखे पण काही नाही. कारण परमेश्वर साधकाची भावना ओळखतो. त्याच्यापासून काही लपून राहात नाही.

(३) कोणत्याही आश्रमात, मानापमानात समदृष्टी ठेवणे हा साधनापरायण मनुष्याचा धर्म आहे. अपमानाचा योग्यप्रकारे विरोध करीत राहून देखील मनुष्य मानापमानात समदृष्टी राखू शकतो. द्रौपदीच्या अपमानाला अर्जुनाने

क्षमा केली किंवा नाही, हे त्याच्या व्यवहारावरून समजू शकत नाही. आणि शिवाय हा प्रसंग अर्जुनाच्या जीवनात गीतोपदेशाच्या आधी आला होता. त्या वेळी अर्जुन मानापमानात समदृष्टी झाला होता, असे कुठे वाचण्यात नाही. भगवंतांनी सन्मानेच्छुकांच्या दृष्टीने मोठेपणाला महत्त्व दिले आहे, आध्यात्मिक जीवन दृष्टीने नाही. म्हणून इथे तीही शंका उद्भवत नाही.

(४) 'काम आणि राम एका ठिकाणी राहू शकत नाहीत' - हे म्हणणे एखाद्या ईशप्रेमी भक्ताच्या दृष्टीतून बरोबर आहे. कारण ईश प्रेमात सौख्यभोगाच्या इच्छेला स्थान नाही. श्रीकृष्णाने संपत्तीची इच्छा करणाऱ्या भक्ताला उदार म्हटले आहे, हाही त्याच्या दयाळू स्वभावाचा महिमा आहे; कारण तो प्राणिमात्राचा परममित्र आहे. देव स्वत:ला आपल्या भक्तांचा ऋणी मानतो, पण म्हणून, 'देव माझा ऋणी आहे', असे कुणी भक्त म्हणू शकेल का ? याच प्रकारे गीतेमध्ये भगवंतांनी जेव्हा असे म्हटले आहे की, 'धर्मसंगत काम मी आहे', तिथे ईश्वराच्या विभूतींचे वर्णन आहे. म्हणून त्यात दोषपूर्ण असे काही नाही.

(५) गीतापठण येताजाता, कशाही परिस्थितीत, करण्यात चुकीचे काही नाही, पण त्याच्या अर्थाचे मनन करून त्याप्रमाणे आपली जीवनचर्या व्यतीत करणे हे अधिक महत्त्वाचे.

देवाच्या नावाचा निरंतर जप करणे अशक्य आहे, कारण त्यात वाणीचा संबंध आहे. परंतु निरंतर स्मरण होऊ शकते, कारण प्रेम झाले की, स्मरण आपोआपच होते. ते करायला लागत नाही. करण्यात परिश्रम आहे, होण्यात नाही. परिश्रमानंतर विश्रामही अनिवार्य आहे.

प्रेमात अन्न, जल, निद्रा, स्वास्थ्य, हानी वगैरे गोष्टींकडे दुर्लक्ष झाले तरी काही बिघडत नाही, पण मुद्दाम हलगर्जीपणा करता कामा नये.

## ५२

**प्रेमपूर्वक हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. आपल्या प्रश्नांची क्रमवार उत्तरे खाली देत आहे. आशीर्वाद देण्याचा अधिकार माझा नाही.

(१) ईश्वराची सत्ता आणि श्रेष्ठता यांवर विश्वास ठेवला जातो. विश्वास ठेवला की देवाच्या कृपेने ज्ञान मिळते. 'ईश्वर की सत्ता और महत्ता' नावाचे एक हिंदी पुस्तक गीताप्रेसने प्रकाशित केले आहे, त्यात याबद्दल सविस्तर लिहिले आहे.

(२) प्राण्यांच्या कर्माची फळे देण्यासाठी, विभिन्न प्रकारची विश्वरचना करण्यात आली आहे. साधनेनंतर त्याच्या विशेष रहस्याचा अनुभव प्रत्ययास येतो. या विश्वाच्या रचनेत ईश्वराची किती कृपा भरून राहिली आहे, याची जाणीव सामान्य मनुष्याला होत नाही. परमकृपाळू परमेश्वर जे काही घडवून आणतो ते समस्त प्राणिमात्राच्या हितासाठी आणि त्यांनी ईश्वराभिमुख व्हावे यासाठी असते. परंतु भोगवासनेमुळे ज्यांचा विवेक निद्रितावस्थेत आहे, त्यांना या रहस्याचा बोध होत नाही.

(३) जीवांचे जन्ममरण प्रारब्धवश होते यात काही संशय नाही; पण व्यभिचार मात्र प्रारब्धवश होत नाही. ते नवे कर्म आहे. ते करणाऱ्यांना त्याचे फळ भोगायलाच लागणार. याबाबतीत हे समजणे आवश्यक आहे की, व्यभिचारातून उत्पन्न होणारी संतती, आपल्या कर्मांची फळे भोगण्यासाठी, त्या प्रकारच्या मातापित्याच्या पोटी जन्माला आली आहे, त्यात त्यांचा काही दोष नाही. मातापिता मात्र नक्कीच दोषाचे भागीदार होतील. ज्याप्रकारे कुणी कुणाची हत्या केली तर ज्याची हत्या झाली, त्याचे मरण ठरलेलेच होते, म्हणून तो त्याच्या प्रारब्धाचा भोग झाला; पण हत्या करणाऱ्याने नवे कर्म केले आणि त्याने परमेश्वरी विधानाच्या विरुद्ध हत्या केली, म्हणून तो पापाचा भागीदार नक्कीच होणार.

(४) जो स्वत: सर्वप्रकारच्या कर्म-फल बंधनातून मुक्त आहे आणि अन्य जनांना मुक्त करायला समर्थही आहे, त्यालाच गुरू होण्याचा अधिकार आहे. देहाचा अहंकार बाळगणाऱ्या, रागद्वेषग्रस्त मनुष्यास गुरू होण्याचा हक्क नाही. जर कोणी चुकीने अयोग्य माणसास गुरुपदी बसविले, तर त्याचा सत्कार-सन्मान करावा, पण पारमार्थिक पातळीवर त्याला गुरू मानता कामा नये.

(५) रामचरितमानसमध्ये सीतेला गुरु-सेवेची शिकवण केव्हा आणि

कोणी दिली हे पहावे. त्यात गुरु-दीक्षेसंबंधी प्रकरण नसावे. श्रीरामाच्याच गुरूला गुरू मानून त्याची सेवा करण्याबद्दल उल्लेख असावा. आपण विशिष्ट प्रसंगाच्या संदर्भाने विचारले असते तर पूर्ण उत्तर देता आले असते. स्त्रियांनी कुणा अन्य पुरुषाकडून दीक्षा घेण्याचा विरोध सर्वस्वी योग्य आहे.

(६) नवीन कर्म करताना होणारे सुखदु:खाचे भोग, प्रारब्ध-भोगाच्या अंतर्गतच असतात. भोगासाठी केल्या जाणाऱ्या कर्मात जेव्हा शास्त्रोक्त विधानाचे उल्लंघन अथवा पालन होते, त्यातूनच पापपुण्यरूप नव्या कर्मांचा संचय होतो.

(७) जो प्रकृती (माया) आणि जीव या दोहोंचा स्वामी व प्रेरक आहे, जो सर्वज्ञ, सर्वशक्तिमान अनादी आणि अनंत आहे, जो कल्याणमय गुणसमुच्चयाचा सागर आहे, तोच परमेश्वर आहे. कर्माच्या फलस्वरूप प्राप्त झालेली सुखदु:खे भोगणारा, बंध आणि मोक्ष यांचा भागीदार आणि स्वत:चे व प्रभूचे अंतरंग न जाणणारा, तो जीव होय. ईश्वराच्या प्रेरणेने जीवास भोगात टाकणारी जी प्रकृती तिलाच माया असे म्हणतात.

(८) हे खरे आहे की, ईशकृपेने हे मनुष्यशरीर ईशप्राप्तीसाठीच मिळाले आहे. परंतु याची जाणीव नसणारे अधिकांश लोक देवाच्या कृपेने प्राप्त झालेल्या विवेक-शक्तीचा अनादर करून, सुखभोगाच्या मोहाने आणि दु:खाच्या भीतीने कर्मबंधनात अडकून पडतात.

(९) जो विवेकबुद्धीचा आदर करतो तो साधक. राग-द्वेषाधीन होऊन विवेकबुद्धीचा अनादर करणारे म्हणजेच स्वेच्छाचारी आणि भोक्ता. देवाला जिवाच्या भविष्याचे ज्ञान आहे. त्याने जिवाच्या उन्नतीसाठी नवीन कर्मांचे स्वातंत्र्य दिले आहे. जिवाचा प्रारब्ध-भोग ठरलेला आहे, नवीन कर्मे ठरलेली नाहीत.

(१०) देवावर विश्वास असेल, त्याच्याशी नाते जुळले असेल, त्याच्या नावावर पूर्ण श्रद्धा असेल, त्याच्या नावाचा जप आणि रूपाचे ध्यानही केले जात असेल तर रामनामाची धारणा झाली, असे निश्चित ओळखावे.

(११) सत्य आणि शुभ आचरणामुळे कुणाचा नाश होण्याचे काही कारण नाही आणि जर असे होत असेल तर, आपले कुठे चुकते आहे हे

साधकाने शोधावे. कदाचित आपल्या सदाचाराच्या अहंकारामुळे आपल्या एखाद्या मित्राचा अपमान होऊन त्याला दुःख होत असेल. साधकाने आपले आचरण असे ठेवावे की, दुसऱ्याचे दोष न पाहता त्याच्या अधिकाराचे रक्षण होईल, आपल्या कर्तव्यपालनाने दुसऱ्याचे हित आणि सुखसंपादन होईल. मोबदल्यात कुणाकडून काही अपेक्षा करू नये, आपल्या सद्गुणांचा अहंकार करू नये, कटू शब्द बोलू नयेत आणि कुणाचे वाईट चिंतू नये. असे केल्यास कोणासही दुःख होणार नाही.

(१२) वेदोक्त विद्येचा अधिकार फक्त द्विजांना आहे, हे जरी खरे असले तरी पौराणिक आणि ऐतिहासिक ग्रंथाध्ययनाचा अधिकार सर्वांना आहे. त्यात जातपात आड येत नाही. शबरी भिल्लीण होती, पण भगवान रामांनी स्वतः तिला उपदेश दिला. जर अधिकार नसता, तर भगवान रामांनी स्वतः तिला उपदेश कसा दिला असता ?

(१३) ब्रह्मधाम, स्वर्गलोक, पाताळ आणि नरक हे सगळे स्वतंत्रपणे अस्तित्वात आहेत. त्यात राहणाऱ्या जिवांना ते दिसतात, मृत्युलोकी राहणाऱ्या प्राण्यांना कसे दिसतील ? एका देशात राहणाऱ्यास मृत्युलोकातल्या सगळ्या स्थानांचे दर्शनदेखील होत नाही, मग अन्य लोकांबद्दल बोलायलाच नको. दुरून दिसणाऱ्या सूर्यलोक, चंद्रलोक, ध्रुवलोक इत्यादी लोकातल्या घटनादेखील आपल्याला प्रत्यक्ष दिसत नाहीत, मग जे लोकही आपल्याला दिसत नाहीत, त्यातल्या गोष्टी प्रत्यक्ष कशा दिसतील ?

(१४) खरी शांती मिळविण्यासाठी कुठल्यातरी संप्रदायात शिरणे अनिवार्य नाही, खऱ्या शांतीची पिपासा लागली पाहिजे, मग परमेश्वरी कृपेने मार्ग आपोआप सापडतो.

(१५) माझ्या मते, कलियुगी प्राण्यांसाठी सगळ्यात सोपा मार्ग असा की, परमेश्वर आहे असा विश्वास करावा, त्याला आपला परमहितैषी समजावे आणि प्रेमपूर्वक त्याच्या नावा-रूपाचे ध्यान करीत राहून त्याच्या कृपेकडे डोळे लावून बसावे.

मी आपल्या सामान्य बुद्धीनुसार आपल्या प्रश्नांची उत्तरे दिली आहेत. त्यातूनही काही शंका असल्यास पुनः विचारू शकता.

## ५३

**सादर हरिस्मरण.**

आपले पत्र मिळाले. मजकूर समजला. आपण आजकालच्या ज्या प्रकारच्या संतांबद्दल लिहिले आहे, तसले दिखाऊ संत खूप फिरतांना दिसतात. त्यातले कितीतरी ठक, चोर आणि पाखंडी पण असतात. ज्या वेषाचा आदर-सत्कार होतो, त्या वेषाची नक्कल स्वार्थी लोकांनी सुरू केली तर त्यात आश्चर्य करण्यासारखे काही नाही. साधकाने अशा लोकांपासून सावध राहावे.

रामनाम हे केव्हाही चांगलेच, मग साधक त्याचा जप कुणाच्याही सांगण्यावरून करो. जितक्या मनोभावे जप कराल, त्याप्रमाणे लाभ होईल.

गुरू हा नीट विचार करून मगच करावा. येता जाता समोर भेटलेल्या कुठल्यातरी अपरिचित गुरुवेषधारी माणसाला गुरू करणे अगदीच चुकीचे आहे. समजा चुकून असे केलेच तर नंतर त्याचे पाखंडी रूप उघडकीस आल्यावर त्याच्याशी संबंध तोडावा आणि जमेल तसे त्याचे भले करावे. साधकाने कुणाबद्दल वाईट बोलू नये. कुणाचे दुर्गुणही पाहू नयेत. आपल्याच चुका आणि अवगुण शोधून त्यांची पुनरावृत्ती होऊ न देणे हे साधकाचे काम.

सद्गुरू कधी नीच असूच शकत नाही. कारण गुरू शब्दाचा अर्थच उच्च, मोठा, श्रेष्ठ आणि वजनदार असा आहे, मग गुरू आणि नीच या दोन शब्दात सुसंगती असेलच कशी ?

गुरू शोधण्यापूर्वी शिष्याने स्वत:ला पात्र बनवावे. जर साधक खरा शिष्य झाला तर त्याला खरा गुरू आपोआप, विनासायास मिळू शकेल किंवा परमेश्वर स्वतः गुरूच्या रूपात येईल. म्हणून साधकाने त्याची चिंता करायचे कारण नाही.

साधकाने कुणालाही विरोध करू नये. मग गुरूला विरोध करायचा प्रश्नच उद्भवत नाही. पूर्ण घटना जाणून घेतल्याखेरीज हे कसे सांगता येईल की, त्या घटनेत परमेश्वराची कोणती विशेष कृपा निहित होती ?

परमेश्वर संतांचा लाडका आहे आणि संत परमेश्वराचे लाडके, यात अणुमात्रही शंका नाही, पण संतांच्या ठायी अवगुणांचा वास असणे कसे शक्य आहे ? तुलसीरामायणात स्वत: भगवान रामचंद्रांनी आपला बंधू भरत यास संत आणि असंत यांची लक्षणे सांगितली आहेत, ती वाचा. संत हे कुणा वेषभूषेचे नाव नाही. परमेश्वर आपल्या प्रिय संतांच्या समस्त दोषांचा स्वत: नाश करून त्यांना परमपवित्र करतो, अशी भगवंतांची प्रतिज्ञा आहे (गीता ९.३०,३१).

कर्मांचे संस्कार म्हणजेच कर्मबंधन. या कर्मबंधनामुळेच प्राणी वारंवार जन्ममृत्यूच्या फेऱ्यात फिरत राहतात. भोगाद्वारे सगळ्या कर्मातून सुटकारा होत नाही. जितकी कर्मे फळभोगासाठी निश्चित केलेली असतात, तितकीच मिटतात, बाकी तशीच संचित राहतात आणि भोगकाळात केल्या गेलेल्या नव्या कर्मांत जोडली जातात. कर्मांचा पूर्ण नाश फक्त परमेश्वराच्या ज्ञानाने (गीता ४.३७) किंवा निष्कामभावानेच होतो (गीता २.५०,५१).

फलभोगासाठी निश्चित झालेल्या पूर्वकृत कर्मांना प्रारब्धकर्मे असे म्हणतात. ती भोगालाच कारण आहेत, नवीन कर्मजनक नाहीत. पूर्वजन्मात संचित झालेली कर्मे भूतकाळापासून संस्काररूपात शिल्लक असतात. या संस्कारांमुळे मनात चांगल्या-वाईट विचारांचे आंदोलन होत राहाते. त्या विचारांनुसार कर्म करण्या न करण्यासाठी प्राणी स्वतंत्र आहे; म्हणून मनुष्यजीवन दोन्ही प्रकारांनी संचालित होते, असेच मानले पाहिजे.

देवाची शरणागती पत्करून त्याच्यावर पूर्ण भरवसा टाकल्यानंतर संसारमार्गातील काटे टोचत नाहीत. कारण प्रत्यक्ष भगवंतांनी गीतेत अर्जुनाला सांगितले आहे की, माझ्यामध्ये मन स्थिर केल्यावर तू माझ्या कृपेने सगळ्या अडचणींतून तरून जाशील (गीता १८.५८).

जोपर्यंत साधक फक्त आपल्या स्वत:च्या बळावर अवलंबून राहातो, तोपर्यंत निरिच्छ असूनसुद्धा कुठलीतरी इच्छा त्याच्या मनास जखडते. परंतु जेव्हा तो आपल्या शक्तीचा अहंकार त्यागून आपल्या दौर्बल्याशी परिचित होतो आणि परमेश्वराच्या अनंत महिम्यावर विश्वास ठेवून

त्याच्यावर संपूर्ण भरवसा टाकतो. त्यानंतर त्या साधकास काहीच जखडू शकत नाही.

(५४)

**सादर हरिस्मरण.**

आपले एक पत्र, 'गीता प्रेस, कल्याण' यांच्यामार्फत मिळाले. मजकूर समजला.

आपण आपल्या पत्रात देवाची कृपा, श्रद्धा आणि भगवद्भक्तीचा जो अर्थ प्रकट केला आहे, तो बरोबर नाही. त्यांचा खरा अर्थ समजल्यानंतर लोकसेवा आणि निष्कामभाव हे त्यापासून भिन्न राहात नाहीत, त्यात सामावले जातात.

आपला पती फार श्रद्धाळू आहे आणि प्रत्येक कामात भगवत्कृपा अनुभवतो, ही खूपच भाग्याची गोष्ट आहे आणि महत्त्वाची पण. जर तो खरोखरीच असे करीत असेल तर आपण त्यांचे अनुसरण केले पाहिजे.

आपली आपल्या पतीशी या विषयावर बरीच चर्चा होते, ही फार चांगली गोष्ट आहे. प्रत्येक गृहस्थास अशी सुसंधी मिळत नाही.

आपण परमेश्वराच्या अस्तित्वाबद्दल जे विचार प्रकट केले आहेत त्यात काहीच दुमत नाही. आपल्या शंकांची क्रमवार उत्तरे खालीलप्रमाणे -

(१) आपण लिहिता की, आपले यश आणि अपयश आपल्या गुणांची वृद्धी आणि घट यांच्यावर अवलंबून आहे. यावर आपण गांभीर्याने असा विचार करावा की, त्या गुणांचा विकास करायला आपण कितपत समर्थ आहोत ? मनुष्यात जी स्वाभाविक विवेकबुद्धी आहे, ती त्याला कुठून आणि कशी मिळाली ? विवेकबुद्धी ही कुठल्यातरी कर्माचे फळ नाही. कर्माचे फळ हे फक्त अनुकूल किंवा प्रतिकूल भोगांच्या प्राप्तीच्या रूपातच असते.

मनुष्यमात्रामध्ये गुणांचा विकास कमी जास्त प्रमाणात दिसतो ? सर्वांची आकलनशक्ती वेगवेगळी का असते ? ज्या स्थितीला एकजण उन्नती मानतो त्यालाच दुसरा पतन समजतो - अशा मतभेदाचे कारण काय ?

गुणांचा विकास, कुठल्या सीमेपर्यंत आपले प्रयत्न व साधनेवर अवलंबून आहे ? आपल्याला जसे कर्माचे स्वातंत्र्य आहे तसे फळाचेही स्वातंत्र्य आहे का ?

(२) आपण अहंकाराबद्दल बोलत आहात, असे मानायचा मला अधिकार नाही, परंतु स्वत:च्या कोणत्याही गुणाचा गर्व असणे हा काय अहंकार नाही ? आपण स्वत:च याचा विचार करावा. यशाचे श्रेय गुणास जाते असे आपण मानू शकता, परंतु असेही पाहण्यात येते की, एखाद्या कामात बुद्धिमान, गुणी, परिश्रमी माणसाला यश मिळत नाही आणि त्याच कामात एखादा गुणहीन मूर्ख थोड्याशा श्रमानेच यशस्वी होतो. याचे कारण काय ? आपल्या पाहण्यात अशी उदाहरणे येतात ना ?

(३) चहात साखर कमी जास्ती पडली आणि आपला पती, तो चहा देवाची इच्छा समजून प्यायला, तर त्यात वाईट काय आहे ? जर त्यांना असे वाटले की, याने आपल्याला काही अपाय होईल तर तो पिणार नाही. परंतु बेचव म्हणून तो न पिणाऱ्यापेक्षा चवीची पर्वा न करता पिणाराच चांगला. प्रत्येक घटना हा एक ईश्वरी संकेत मानणे हा श्रद्धेचा अतिरेक नाही; कारण तीच वास्तविकता आहे. जो देवाच्या इच्छेविरुद्ध जातो त्याच्या वाटणीस दु:ख आणि शोक येतात. तो लाभास मुकतो. देवाची इच्छा ही मानण्याची गोष्ट आहे, सांगण्याची नाही. यादृष्टीने भले आपण त्यांच्या त्या विधानास देवाच्या इच्छेची चेष्टा असे म्हणा, पण हा विश्वास फार चांगला आहे. हां, त्यांनी प्रत्येकासमोर असे म्हणता कामा नये.

(४) परमेश्वरी कृपेसाठी आर्तपणे हाक घालणाऱ्यांपैकी अधिकांश आपल्याला असे भेटतील की, ज्यांचा देवाच्या कृपेवर भरवसा नाही. आपल्या हाताबाहेरच्या परिस्थितीत ते देवाच्या नावाचा टाहो फोडतात. परंतु अनुकूल परिस्थितीत प्रसन्न राहून, ती कायम राहावी अशी अपेक्षा करतात. त्यासाठी जे काम करू नये तेही करतात. अशा लोकांचा भगवत्कृपेवर भरवसा नसतो. ते फक्त तसा देखावा करतात.

(५) आपण लिहिले आहे की, 'गुण, विकास इत्यादी गोष्टी देवावर अवलंबून आहेत, हे विधान बुद्धीला पटणारे आणि तर्कसंगत नाही.' -

पण असे असायचे कारण नाही, कारण मनुष्य कर्मफलभोगाच्या बाबतीत पराधीन आहे, हे तर आपणास मानायलाच लागते. आपण केलेल्या कर्मांची फळे कालांतराने व्यवस्थापूर्वक देणारी कुणी तरी एक अव्यक्त शक्ती अस्तित्वात आहे. कोणीही मनुष्य आपल्या मनसोक्त इच्छा पूर्ण करायला समर्थ नाही. आपण पूर्णतः निरोगी असावे असे प्रत्येकाला वाटते, तरीही अगदी नियमशीर जेवण्याखाण्याकडे लक्ष देणारे बुद्धिमान लोकदेखील आजारी पडताना दिसतात.

आपल्या बुद्धीने पडताळून, 'अमुक काम चांगले नाही, त्याने माझ्या विकासात अडथळा येईल,' हे मनुष्य समजतो आणि तरीही ते करतो. इतकेच नव्हे तर जे करणे योग्य आहे, असे त्याची बुद्धी त्याला सांगते, तेही तो करीत नाही. हे त्याचे दौर्बल्य नव्हे काय ? हा आपल्या विवेकबुद्धीचा अनादर नाही का ? आणि जर असेल, तर हे दौर्बल्य आपल्यातही नाही का ?

विचारांती हे स्पष्ट होईल की, मनुष्य स्वप्रयत्नाने आपल्या गुणांचा विकास कोणत्या मर्यादेपर्यंत करू शकतो आणि कुठपासून पुढे त्याला देवाच्या कृपेने मदत मिळू शकते ?

(६) आपले जे मत आहे की, 'परमेश्वराची कृपा वगैरे काही खरे नाही', यात आश्चर्यकारक असे काही नाही. खूप लोक असे मानतात. पण असे मानणाऱ्यांचा काही फायदा झाल्याचे कुठे पाहण्यात नाही. जे लोक प्रत्येक गोष्टीचा देवाच्या दयेशी संबंध जोडतात, ते प्रत्येक परिस्थितीत ईशप्रेमात तल्लीन राहतात. त्यांना काम, क्रोध, हर्ष, शोक आदी कुठलेही विकार दु:खात टाकू शकत नाहीत. म्हणून त्यांचा हा विश्वास अज्ञानाचे प्रतीक नाही, उलट तसे न मानणेच अडाणीपणाचे आहे.

(७) आपण लिहिले आहे की, 'प्रत्येक क्रियेशी देवाच्या कृपेचा संबंध जोडण्याने साधारण माणसाच्या निरंतर कार्यशीलतेचा आणि उत्साही जीवनाचा ऱ्हास झाला आहे.' आपले हे म्हणणे तर्कसंगत नाही. प्रत्येक क्रियेशी देवाच्या कृपेचा संबंध जोडणारा मनुष्य सामान्य नाही, तो महात्माच आहे. त्याचे जीवन जितके उत्साहमय, स्फूर्तिमय आणि निर्भय

असू शकते, तितके सामान्य माणसाचे असणेच शक्य नाही. कारण सामान्य मनुष्य केवळ आपल्या मर्यादित बळावर, पुरुषार्थावर अवलंबून असतो. मग ज्या भक्ताजवळ ईशकृपेची अमर्याद शक्ती आहे त्याची बरोबरी कुणीही कशी बरे करू शकेल ?

(८) परमेश्वरावर सर्वस्वी भरवसा ठेवून औषधाशिवाय राहणारा आणि रोगाच्या कष्टास तप समजून व परमेश्वराची कृपा मानून आनंदाने सहन करणारा आजारी मनुष्य, औषधपाणी करणाऱ्याच्या तुलनेने फार श्रेष्ठ आहे. परंतु जर तो त्या रोगाने दु:खीकष्टी होऊन देवाच्या नावाने खडे फोडत असेल आणि आळस किंवा कामचुकारपणा करून औषध घेत नसेल व मोहवश कुपथ्य करीत असेल तर त्याचा ना देवाशी काही संबंध आहे ना देवाच्या कृपेशी. तो फक्त आल्या दोषांवर पांघरूण घालायच्या प्रयत्नात आहे.

जी माणसे देवाच्या नावाखाली टाळाटाळ करतात, त्यांचा वस्तुत: देवावर आणि देवाच्या कृपेवर विश्वास नसतो, ते काहीतरी कारण काढून आपल्या चालढकलीवर पांघरूण घालतात, असे म्हटल्यास त्यावर दुमत नसावे.

(९) सामाजिक आणि आर्थिक वैषम्याच्या दलदलीत फसलेल्या माणसाचा देवाच्या इच्छेवर विश्वास आहे, असे समजणे चुकीचे आहे. माणूस असून दुसऱ्या माणसाचे शोषण करणे, त्याबद्दल मनाला काहीही न वाटणे, हे तर नास्तिक माणसाचे काम आहे. अशा माणसांचा उल्लेख भगवंतांनी गीतेच्या सोळाव्या अध्यायात १८ व १९ व्या श्लोकात केला आहे. देवावर विश्वास ठेवणारे, त्याच्या कृपेवर भरवसा ठेवणारे, कोणत्याही परिस्थितीत देवाच्या कृपेचा अनुभव घेणारे लोक हे सर्व प्राणिमात्रांशी आपुलकीने वागणारे, सर्वांचे मित्र व दु:खितांवर दया करणारे असतात आणि असे भक्त देवाला प्रिय असतात. त्यांच्यात मोह आणि अहंकार यांचा लवलेशही नसतो. गीतेच्या बाराव्या अध्यायातील १३ ते १९ या श्लोकांत त्यांची लक्षणे वाचावीत.

(१०) मनुष्यास मिळालेली बुद्धी आणि विवेक हाही देवाच्याच कृपेचा

प्रसाद. म्हणून त्यांचा आदर करणे म्हणजेच देवाच्या कृपेशी कृतज्ञ राहून त्याच्यावर भरवसा ठेवणे होय. या प्रसादाचा अनादर करून बुद्धी आणि विवेक यांच्याविरुद्ध आचरण करणे हा अपराधच आहे.

(११) आपण शुद्ध भौतिकवादी नाही, तसेच पाश्चिमात्त्य परंपरेनुसार मनुष्य स्वार्थी, लोभी, ऐहिक सुखोपभोगांची अभिलाषा बाळगणारा आणि विलासी व्हावा असेही आपणास वाटत नाही, ही भावना फार उत्तम आहे. असाच भाव ठेवावा. परमेश्वर आणि त्याच्या कृपेशी नितांत, निरंतर नाते असणाऱ्या आणि देवाठायीच्या विश्वासावर पूर्णपणे अवलंबून असणाऱ्या, अशा निरिच्छ आध्यात्मिक जीवनातूनच असा भाव उपजू शकतो.

(१२) आपण लिहिले आहे की, 'तुमची देवाच्या ठायी जी श्रद्धा आहे, तीच श्रद्धा मी समाजाच्या ठायी ठेवू इच्छिते.' मला असे वाटते की, श्रद्धा या शब्दाचा खरा अर्थ आपल्या नीट लक्षात नाही आला. समाजातील एखादी विशिष्ट व्यक्ती श्रद्धेय असू शकते, पण पूर्ण समाज नाही. कारण समाजात तर सर्व प्रकारचे लोक असतात.

(१३) आपण लिहिले आहे की, समाजही ईश्वराप्रमाणे अरूप, निराकार वगैरे सर्व काही आहे. कुठल्या समाजाबद्दल आपण हे लिहिले आहे ? माझ्या लक्षात नाही आले.

देवाची भक्ती आंधळी आणि निष्क्रिय असते, हे आपण कुठे शिकलात? देवाच्या भक्तीमध्येच तर पूर्ण ज्ञानशक्तीचे भांडार आहे. तिथे अंधार कसा असणार ? समाज हेही त्या देवाचेच एक रूप. त्याला देव समजून त्याची सेवा केली तर ती देवाचीच सेवा. परंतु तशी भावना नसेल तर ते सेवेच्या नावाखाली आपला मोठेपणा आणि स्वार्थसिद्धी यांच्यासाठी केले जाणारे कर्म आहे आणि असे कर्म सर्वार्थी बंधनकारक आहे.

जेव्हा समाजासाठी भक्तिभावाने केलेल्या त्याग, संयम आणि कर्माच्या मोबदल्यात, मनुष्य, समाज किंवा जगाकडून काहीही अपेक्षा करणार नसेल, तेव्हाच त्याचा तो त्याग, संयम व कर्म निष्काम आहे असे मानता येईल.

देवाच्या नावाखाली जे लोक समाजद्रोही आचरण करतात, दुसऱ्यांशी वैरभाव ठेवतात, दुसऱ्यांचे अहित करतात, त्यांना तुम्ही देवभक्त म्हणाल का ? कधीच नाही. असे करणे हा देवाच्या 'नावा'चा अपमान आहे. जो मनुष्य या भरवशावर पाप करतो की, मी देवाचे नाव घेऊन ते पाप धुऊन टाकीन, तो देवाच्या नावात जी शक्ती आहे, तिच्यापासून सर्वथा अनभिज्ञ आहे. त्याला भक्त मानणे चुकीचे आहे. सगळ्या चांगल्या कामातही ढोंगीपणा चालतो. समाजसेवेच्या नावाखाली लोक कशी आपली पोळी भाजतात आणि कसे जनतेला लुबाडतात, ही गोष्ट कुणापासून लपली नाही. मग देवभक्तीच्या नावाखाली कुणी दांभिकपणा केला तर त्यात आश्चर्य करण्यासारखे काही नाही. पण जिथे दांभिकपणा आणि पाखंड दोन्ही आहे, तिथे ईशभक्ती पण नाही आणि समाजभक्ती पण नाही.

ज्याचे देवावर प्रेम आहे, तो त्या देवाच्या प्रजेचे अहित कसे करील ? समाजावर प्रेम करणारा, अहंकारवश कदाचित असे करीलही. कारण समाज अनेक वर्गात वाटलेला आहे. त्यातला एक सामाजिक वर्ग दुसऱ्या सामाजिक वर्गाचा शत्रूही असू शकतो. एका देशाचा भक्त आपल्या देशाच्या उत्थानासाठी दुसऱ्या देशावर दडपण आणू शकेल, परंतु समस्त विश्वाला एकमेव परमेश्वराची अभिव्यक्ती समजणारा मनुष्य कोणत्याही प्राण्याचे अहित कसे बरे करील ? तो तर असेच मानतो की, आपल्या सोबत्याशी वैर म्हणजे ईश्वराशीच वैर. म्हणून आपण भगवद्भक्तीचे रहस्य समजून घ्या. त्या भक्तीचा वाटेल तसा अर्थ काढून तिची किंमत कमी लेखू नका.

महात्मा गांधी समाजसेवक नव्हते का ? आणि होते, तर ते देवाचे भक्त नव्हते का ? त्यांचा ईशकृपेवर विश्वास होता ना ? ते प्रत्येक कामाचा देवाशी संबंध जोडायचेच ना ? त्यांचे आत्मचरित्र, रामनामावरचे पुस्तक आणि गीतेचा अनासक्तियोग वाचल्यावर आपणास समजेल की, ईश्वर व ईशनाम यांच्यावर त्यांचा किती विश्वास आणि श्रद्धा होती. त्यांचा देवाच्या कृपेवर केवढा भरवसा होता आणि त्या भरवशाच्या बळावर त्यांना आपल्या कार्यात किती यश मिळाले.

आपण कदापि असे म्हणू शकणार नाही की, महात्मा गांधींची भक्ती आंधळी किंवा निष्क्रिय होती, किंवा ते ईश्वरभक्त नव्हते.

(१४) आपण लिहिले आहे की, 'देवभक्तीमधला आंधळेपणा पहाता समाजभक्ती हेच एकमेव उत्तम साधन आहे'. जोपर्यंत आपणास भगवद्‌भक्तीचे खरे स्वरूप आणि समाजभक्ती हे तिचे केवळ एक अंग आहे या रहस्याचा उलगडा होत नाही, तोपर्यंतच आपणास असे वाटेल. ईश्वर आणि ईश्वरभक्ती प्रकाशमय आहे. जसा सूर्याजवळ अंधकार राहत नाही, तसेच जिथे ईश व ईशभक्ती असेल तिथे अज्ञान राहात नाही.

(१५) परमेश्वराची कृपा आणि त्याची इच्छा यांचा भक्तांच्या जीवनाशी काय संबंध आहे, हे आपण विचारपूर्वक समजून घ्यावे.

(क) अनिच्छेने, म्हणजेच दैववश. उदाहरणार्थ - नदीला पूर येणे, अतिवृष्टी होणे, दुष्काळ पडणे, वीज पडणे, घर कोसळणे वगैरे. या सर्वांमुळे होणाऱ्या नफा-नुकसानामुळे खऱ्या भक्ताच्या जीवनात हर्ष किंवा शोक यांचा प्रवेश होत नाही. कारण हे देवाच्या इच्छेनेच होते हे त्याला माहीत असते. परंतु तरीही तो आपले कर्तव्य विसरून जात नाही. तो पूरपीडितांच्या मदतीस धावून जातो आणि तनमनधनेकरून त्यांची सेवा करणे हेच आपले कर्तव्य समजतो. तो असेच मानून चालतो की, हे सगळे काही देवाचेच आहे आणि ते सत्कारणी खर्च करण्याचा विवेक आणि शक्ती त्याने मला दिली आहे. म्हणून अशा भक्ताच्या जीवनात आळस, कामचुकारपणा, अवहेलना किंवा कर्तव्यहीनता यांना मुळीच जागा नसते.

(ख) परेच्छेने देखील कर्मफलभोग होतो. उदाहरणार्थ, कुणी कुणाला धन देतो, कुणी कुणाचा खून करतो, कुणी कुणाचा अपमान करतो, वगैरे.

या घटनांमध्ये ज्याला त्रास दिला जातो किंवा धन मिळते, ज्याचा अपमान केला जातो, त्याच्या दृष्टीने ही सारी कामे परेच्छेने होतात. जो ही कामे करतो, तो ती स्वेच्छेने करतो.

देवाचा भक्त कोणत्याही वस्तूस, व्यक्तीस आणि परिस्थितीस आपल्या सुखदु:खाचे कारण समजत नाही. तो असेच समजतो की, जे काही

चालले आहे ते देवाच्या इच्छेनेच चालले आहे. म्हणून त्या सुखाचे कारण प्रतीत होणाऱ्या माणसावर किंवा वस्तूवर त्याचा अनुराग नसतो आणि दु:खाचे कारण प्रतीत होणाऱ्यांवर त्याचा रागही नसतो. सर्वांठायी त्याची समबुद्धी असते. मग त्याच्या जीवनात कुणाचे अहित किंवा अनिष्ट करायचा प्रसंगच कसा येईल ?

(ग) तो स्वेच्छेने जे काम करतो, ते परमेश्वराची आज्ञा आणि प्रेरणा आहे असे समजून त्याच्या इच्छेशी आपल्या इच्छेचा संगम घडवून त्याच्या नियमानुसार करतो. तो असे समजतो की, 'देवाने दिलेले बळ, बुद्धी आणि संपत्ती यांचा उपयोग त्याच्या आज्ञेनुसार करणे हेच माझे कर्तव्य आहे. हे सारे मला आपल्या सुखोपभोगासाठी नाही, तर विचारपूर्वक सदुपयोग करण्यासाठी मिळाले आहे, अशा धारणेने तो धैर्य, उत्साह, निर्भयता आणि निर्लोभीपणाने आपले बळ, बुद्धी आणि संपत्ती यांचा सत्कारणी उपयोग करीत राहातो. त्यासाठी जे काही कार्य किंवा सेवा त्याच्या हातून घडते ती सारी देवाचीच सेवा समजून तो त्याच्या प्रसन्नतेसाठी आणि त्याच्याच इच्छेनुसार करतो. या सर्वांमध्ये तो ईशकृपेचा अनुभव करीत त्याच्या प्रेमात लीन राहतो. हीच खरी भक्ती. याच भक्तीचा आदर्श प्रल्हादासारख्या भक्तांच्या जीवनचरित्रात दिसून येतो.

आपल्या भाषेत मला तर काही कडवटपणा आढळला नाही. माझ्या भाषेत जर प्रसंगवश कुठे कटू शब्दांचा वापर झाला असेल तर त्यासाठी क्षमस्व.

❑ ❑

॥ श्रीहरिः ॥

# गीताप्रेस, गोरखपुरसे प्रकाशित

## कुछ मराठी साहित्य

1314 श्रीरामचरितमानस सटीक (मोटा टाइप)
784 ज्ञानेश्वरी गूढार्थ-दीपिका
853 एकनाथी भागवत—मूल
7 गीता-साधक-संजीवनी टीका
1304 गीता-तत्त्व-विवेचनी
1071 श्रीनामदेवांची गाथा
1808 श्रीतुकाराम महाराजांची गाथा
859 ज्ञानेश्वरी—मूल, मझला
15 गीता-माहात्म्यसहित
504 गीता-दर्पण
748 ज्ञानेश्वरी—मूल, गुटका
14 गीता-पदच्छेद
1388 गीताश्लोकार्थसहित—मोटा टाइप
1257 गीताश्लोकार्थसहित—(पॉकेट साइज)
853 एकानाथी भागवत-मूल
1508 अध्यात्मरामायण
1678 श्रीमद्भागवतमहापुराण—खण्ड-१
1735 श्रीमद्भागवतमहापुराण—खण्ड-२
1776 श्रीमद्भागवतमहापुराण-केवल मराठी अनुवाद
857 अष्टविनायक (चित्रकथा)
1810 कन्हैया ( ,, )
1811 गोपाल ( ,, )
1812 मोहन ( ,, )
1813 श्रीकृष्ण ( ,, )
1718 जीवनादर्श श्रीराम
391 गीता-माधुर्य
1099 अमूल्य समयका सदुपयोग
1335 रामायणके कुछ आदर्श पात्र
1386 महाभारतके कुछ आदर्श पात्र
1340 अमृत-बिन्दु
1382 शिक्षाप्रद ग्यारह कहानियाँ
1210 जित देखूँ तित तू
1330 मेरा अनुभव
1073 भक्त चन्द्रिका
1383 भक्तराज हनुमान्

886 साधकोंके प्रति
885 तात्त्विक प्रवचन
1607 रुक्मिणी स्वयंवर
1744 सकल संतवाणी (भाग-१)
1745 सकल संतवाणी (भाग-२)
1640 सार्थ मनाचे श्लोक
1682 सार्थ सं० देवीपाठ
1732 शिवलीलामृत
1333 भगवान् श्रीकृष्ण
1332 दत्तात्रेय-वज्रकवच
855 हरीपाठ
1169 चोखी कहानियाँ
1385 नल-दमयंती
1384 सती-सावित्री-कथा
1671 महाराष्ट्रातील निबडक संतांची चरित्रे
1781 श्रीदासबोध गद्यरूपान्तरासह
1780 श्रीदासबोध—मझला
1817 पाण्डव-प्रताप
1276 आदर्श नारी सुशीला
1334 भगवान्के रहनेके पाँच स्थान
899 देशकी वर्तमान दशा तथा उसका परिणाम
1341 सहज साधना
1339 कल्याणके तीन सुगम मार्ग और सत्यकी शरणसे मुक्ति
802 गर्भपात उचित या अनुचित फैसला आपका
882 मातृशक्तिका घोर अपमान
883 मूर्तिपूजा
884 सन्तानका कर्तव्य
1279 सत्संगकी कुछ सार बातें
901 नाम-जपकी महिमा
900 दुर्गतिसे बचो
1428 आवश्यक शिक्षा एवं आहार-शुद्धि
1170 हमारा कर्तव्य
881 भगवत्प्राप्तिकी सुगमता
898 भगवन्नाम
1788 श्रीशिवलीलामृतांतील अकरावा अध्याय
1683 सार्थ ज्ञानदेवी गीता
1746 मनोबोध भक्तिसूत्र
1836 श्रीगुरुचरित्र
1814 सामाजिक संस्कार कथा
1815 घराघरातील संस्कार कथा